# मराठमोळा

## ( नाविन्यपूर्ण कवितांचा संग्रह )

: संग्राहक :
जयवन्त बाबुराव जगताप,
बी. ए. ( ऑनर्स )

आवृत्ति पहिली ] मकरसंक्रांत १४ जानेवारी १९३९ [ किंमत १२ आणे

# — अनुक्रमणिका —

# निवेदन

' अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषदेच्या ' पुणें येथील चोविसाव्या बैठकीची आठवण म्हणून, मराठा लघुकथा लेखक व लेखिका यांच्या लघुकथांचा संग्रह ' प्रसाद ' या नांवानें मेच्या २८ तारखेस प्रकाशित केल्यावर, परिषदेच्या पुढील बैठकीप्रसंगीं मराठा कवि व कवयित्री यांचा कविता संग्रह प्रकाशित करण्याची मनीषा व्हावी हें साहजिकच आहे. उमरावतीच्या रौप्य महोत्सव समारंभाच्या स्वागत कमिटीनें पंचविसावी बैठक डिसेंबरच्या शेवटच्या आठवडयांत घेतल्याचें जाहीर करतांच, मीही मराठा कवि व कवयित्री यांस कविता पाठविण्याविषयीं वर्तमानपत्रद्वारें विनंती केली. ' प्रसाद ' प्रमाणें ह्याहीवेळीं सर्वांची सहानुभूति व मदत मिळेल ही गोड आशा आणि पहिल्या प्रकाशनानें मिळालेला साधकबाधक अनुभव यांचा मिलाफ करून मी या दुसऱ्या प्रकाशनाच्या उपक्रमास सुरवात केली.

वाङ्मयरूपी प्रासादांत जातिभेदाची ठिणगी टाकून त्यायोगें आसमंतात खळबळ उडवून देण्याचें कृष्णकारस्थान माझ्या या दोन्ही प्रकाशनाचें मूळाशीं नसून, ठिणगीच्या योगानें दीप प्रज्ज्वलित करून त्याचें प्रकाशांत स्वजातीस या अभूतपूर्व प्रासादाच्या सर्व दालनांत आणून सोडण्याचें कार्य मी यथामति करण्याचा अल्पसा प्रयत्न करीत आहे. अर्थात् आपल्या योग्यतेच्या बळावर प्रासादांत शिरकाव करणाऱ्या माझ्या या लेखकांचा साहित्यवीरांकडून योग्य तो आदरसत्कार होईल अशी मला सबळ आशा वाटते.

' प्रसाद ' चे वेळीं लघुकथासंग्रह प्रकाशित करण्याची कल्पना अनेकांस धाडसाची वाटली होती. आणि म्हणूनच कित्येक लेखकांनीं प्रथमतः माझ्या विनंतीकडे जाणूनबुजून दुर्लक्ष केलें होतें. प्रसादास जर सर्व लेखकांनीं जरूर

ती मदत वेळेवर केली असतीं, तर प्रसादाची रुचि आहे त्यापेक्षांही अधिक वाढली असती. प्रसादाचें प्रकाशनानें माझी कल्पना मूर्तस्वरूपांत आल्यानें ह्या कवितासंग्रहाचे बाबतींत सर्व कवि व कवयित्री यांनीं मला अगदीं वेळे-वर आणि भरपूर मदत केली आहे ही विशेष समाधानाची गोष्ट होय. कवितासंग्रहासाठीं मजकडे सुमारें साठ सत्तर मराठा कवि व कवयित्री यांच्या अदमासें साडेतीनशेंच्यावर कविता आल्या होत्या. त्यांतून संग्रहासाठीं ६४ कविता मी पसंत केल्या. या पसंत केलेल्या कवितांत जसें विषयवैचित्र्य आणलें आहे, तसेंच प्रसिद्धाबरोबर अप्रसिद्ध कवीला पुढें आणण्याचा माझ्या प्रकाशनांतील मुख्य उद्देशही मी साधिला आहे. संग्रहांत कवितांची मांडणी दोनतीन प्रकारानें मला करतां येण्यासारखी होती. तथापि कवि-तांची विषयाप्रमाणें साधारणपणें विभागणी करून, प्रथमपासून शेवटपर्यंत वाचनांत गोडी राहील असा कवितांचा क्रम मी येथें स्विकारला आहे.

माझ्या ह्या प्रकाशनांत मला कसकशी मदत लाभली ते पुढें देत आहें—

प्रथमतः महाराष्ट्रांतील सर्व प्रमुख वर्तमानपत्रांच्या संपादकांनीं माझ्या विनंतपित्रास आपल्या लोकप्रिय पत्रांत स्थान देऊन मला उपकृत केलें आहे तें पत्र जर प्रसिद्ध झालें नसतें तर संग्रहाची कल्पना अशा स्वरूपांत प्रगटच झाली नसती.

श्री० **नारायणराव कोकाटे**, व्यवस्थापक मन्वन्तर मासिक पुणें; प्रसिद्ध गद्यकाव्यलेखक श्री. **शंकरराव साठे** कराची; आणि श्री० **बंडोपंत भोसले** ( सुरेशबाबू ) कोल्हापूर यांनीं मराठा कवि आणि कवयित्री यांचीं नांवें व पत्ते मी मागतांच त्वरित पाठविण्याची तसदी घेतली.

माझे प्रिय बन्धू श्री० **विठ्ठलराव शिरोळे** यांनीं आलेल्या सर्व कविता मजसाठीं वाचल्या आणि श्री० **कमलाकान्त फाटक**, मराठीचें अध्यापक श्री शिवाजी मराठा हायस्कूल पुणें, यांनीं वेळांत वेळ काढून पसंत केलेल्या कवितांतील दोषांची योग्य ती छाननी केली. शिवाय संग्रहाचें बाबतींत त्यांनीं बऱ्याचशा उपयुक्त सूचनाही केल्या.

कविवर्य **गणेश हरि पाटील** यांनीं संग्रहासाठीं '**मराठमोळा**' हें यथायोग्य शीर्षक सुचविलें आणि मला, तसेंच माझ्या बऱ्याच स्नेह्यांना तें सर्वथैव पसंत पडल्यावरून मी तेंच कायम केलें.

कवितासंग्रहास गुरुवर्य **कर्मवीर विठ्ठल रामजी ऊर्फ अण्णासाहेब शिंदे** यांचा आशीर्वाद लाभला हें मी माझें भाग्य समजतों. उतारवय झालें असतांही आणि त्यांत आजारपण पाठीमागें लागलें असतां देखील केवळ मजकरितां त्यांनीं केवढे तरी कष्ट घेतले आहेत. याखेरीज प्रकाशनाचे बाबतींत उपयोगीं पडेल असा मार्गदर्शक उपदेश गुरुवर्यांनीं केला आहे.

श्री० **शंकरराव गणपतराव शिंदे** यांनीं आपल्या मृतपत्नी कै० सौ. **सोनुबाई शंकरराव शिंदे** यांच्या पुण्यस्मृतीस हें पुस्तक अर्पण करण्याची परवानगी दिली.

प्रसिद्ध चित्रकार आणि माझे नूतन स्नेही श्री० **व्ही. के. पाटील**, चित्रकलाशिक्षक – कॅंप एज्युकेशन सोसायटीचें हायस्कूल पुणें, व माझें जुनें स्नेही श्री. **वामनराव पानंगटी** यांनीं '**मराठमोळा**' साठीं आकर्षक चित्रें वेळांत वेळ काढून दिलीं आहेत.

श्री० **गणपतराव शिंदे** ( सरस्वतीकण्ठाभरण ) यांनीं '**मराठमोळा**' यांवर एक सुनीत तात्कडतोब रचून दिलें आहे.

माझे जिवलग स्नेही श्री. **साहेबराव शिंदे**, श्री. **बापूसाहेब जेधे**, बी. ए., श्री. **शंकरराव पंडित** आणि प्रिय भगिनी कु० **सुंदर त्रिभुवन** यांनीं वेळोवेळीं बहुमोल सल्ला देऊन मला सर्वतोपरी सहाय्य केलें आहे.

मे. मॅनेजर हनुमान प्रिंटिंग प्रेस यांनीं पुस्तकाची छपाई शक्य तितकी सुबक करून मुदतीच्या आंत मनपसंत काम करून दिलें आहे.

या सर्व बाबींबद्दल वरील मदतनीसांचा मी फार फार आभारी आहें. त्यांची मदत व सहानुभूति मला पुनः पुनः लाभेल आणि तेणेंकरून मित्रत्व कायम राहील एवढेंच मी अपेक्षा करतों.

पुस्तक प्रथमतः डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत प्रकाशित होणार होतें. आणि त्यादृष्टीनें जवळ जवळ सर्व छपाई तत्पूर्वीच झाली होती; परंतु परिषदेची बैठक लांबणीवर पडल्यानें पुस्तकाचें प्रकाशन मकरसंक्रान्तीस करण्याचें मी ठरविलें. त्यायोगें अनायासें माझा वाढदिवसही साजरा होणार होता. तथापि जानेवारीचा पहिला पंधरवडा आजारांतच गेल्यानें हाही मोका मला साधतां आला नाहीं. आणि प्रकाशन आठचार दिवसानें उशीरां करावें लागलें. तेव्हां प्रथमतः गडबड व नंतर प्रकृतीचें अस्वास्थ्य यांमुळें पुस्तकाच्या छपाईत बरेच दोष राहणें संभवनीय आहे. तरी वाचकांनीं तिकडे कानाडोळा करून ‘ हंसक्षीरबुद्धी ’ या न्यायानें यांतील रसग्रहण करावें एवढी नम्र विनंती आहे.

— शेवटीं प्रकाशनाचें रूपानें समाजाची सेवा करण्याची बुद्धि व शक्ति **शिवप्रभूनें** देऊन माझ्यासारख्या पामरांस धन्य केलें आहे. मी तर बोलून चालून ‘ **फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तो हमाल भार वाही** ’ असा आहे. तेव्हां **शिवप्रभूनें** माझा हा ‘ **मराठमोळा** ’ पावन करून घ्यावा ही प्राथेना.

१२४८ शुक्रवार पेठ,
पुणें शहर.
२० जानेवारी १९३९

आपला कृपाभिलाषी,
**जयवन्त जगताप**

# आशीर्वचन

ही नवकाव्य नवरी कुठून तरी वाट चुकून मजकडे आलेली पाहून मी प्रथम चकित झालों; आशीर्वादासाठीं हात वर करितों तों याच पुस्तकांतलें पुढील चरण दिसलें.

तूं जशी सिनेमा राणी ।
मी असा अजागळ प्राणी ।।
तुझें—माझें एक ठिकाणी ।
जुळेल कां सांग ग ।।

—कृष्णमूर्ति. ( पान ६५ )

जुळो न जुळो, दोन शब्द लिहिणें भागास आलें आहे.

मराठमोळा आणि काव्य ह्या द्वंद्वाचा तत्पुरुष समास घडवणें हाच एक काव्यालंकार होय. ब्राह्मणाचें सोंवळें, आणि हरिजनाची अस्पृश्यता दोन्ही खाकोटीस मारणारा मराठमोळा स्वतःच लवकर विश्वसामान्यांत विरघळून जाणार आहे, हें भाकीत ह्या अलंकारांत दिसत आहे! पन्नास—साठ तुटक गाण्यांचा एक लहानसा गुच्छ, पण तो किती मोठें दृश्य सुचवीत आहे ! शब्दांच्या व वृत्तांच्या चौकटींत न कोंडलेला काव्यनिधी जनहृदयाच्या भुयारांत भरलेला आहे. तो ह्या निमित्तानें वाचक पाहोत, असा माझा ‘ अजागळाचा ’ आशीर्वाद आहे !

बाहुस्फुरण आणि हृदयस्फुरण ह्यांचा अन्योन्य संबंध निदान महाराष्ट्रांत तरी अनुभवसिद्ध आहे. एकाशिवाय दुसरें कोठें चुकून दिसलें तर तें उन्हाळ्यांतल्या ढगाप्रमाणें विफलच ठरणार. आतां तसें न ठरो.

प्रस्तुत कविवृंदाचा व्यक्तिशः परिचय मला फारच थोडा — नाहींच म्हटलें तरी शोभेल. पण तो पाहिजे कशाला ? नाहीं हेंच उत्तम. एरवीं आशीर्वचनाला बाधाच घडणार. हल्लींचा काळ अतिशय कर्कश भासूं लागला आहे. खरी क्रांति कोठें दिसत नसली तरी बोभाटयाची कटकट पुरेशी चालली आहे. कोणी पक्षोपक्षाची जुळवाजुळव करीत आहे, तर कोणी ( बहुतेक ) वेष पालटून कॉंग्रेसमध्यें शिरत आहे. कोणी इलेक्शनमध्यें

थकला आहे, तर कोणी अधिकारमदानें डोलत आहे. कोणी मराठा लीग सारख्या जुन्या भांड्यांना नवीन कल्हई देत आहे, तर कोणाला स्मशान-वैराग्यानें घेरलें आहे. कोणी अद्यापि गणेश खिंडीभोंवतीं धिरट्या घालीत आहे, तर कोणी संस्थानीं तुरुंगांचीं दारें ठोठावीत आहेत. अशा गलक्यांत ही मराठमोळ्याची शुद्ध निष्काम शीळ ऐकून, ह्या गलक्याचा शिळोपा होवो.

मराठमोळा ह्या शब्दप्रयोगांतील मोळा हा शब्द "मराठ्यां" चा एक विशेष आहे. तो इतरत्र क्वचितच आढळतो, किंवा नाहींच. हा शब्द दिसण्यांत अगदीं प्राकृत दिसतो, तरी मूळ संस्कृतच आहे. मुख + डा = मुअ + डा = मोडा = मोळा अशी व्युत्पत्ति आहे. गुजरातींत मोडा व कानडींत मोरी = तोंड असा आढळतो. बंगालींत देखील अशाच अर्थाचा शब्द आहे. उर्दूत रुबाब चा जो अर्थ आहे तोच मोळा ह्याचा मराठींत आहे. महाराष्ट्रांत तीनच मुख्य समाज आहेत. ब्राह्मण, मराठा ( जनपद ), हरिजन. ह्या प्रत्येकाचा मोळा संकेतानें ठरला आहे. प्रत्येकाला तत्समाची पुरवणी आहे. तिचाहि मोळा तोच ठरला असतो. हल्लींच्या धक्काबुक्कींत हे मोळे टिकतील असें वाटत नाहीं. ब्राह्मण्य जाऊं लागलें आहे 'अस्पृश्यता' जाणार आहे. बिचारा मराठा मोळा तर "नाना–महादजी" तंट्यानें बहुतेक गेलाच होता. जो चुकून थोडा उरला, तो इंग्रजसत्तेनें दाबून टाकला आहे. प्रस्तुत काव्यसंग्रहांत तो मला तरी फारसा दिसत नाहीं. कारण तो गेला म्हणून शोकच फार दिसत आहे. उलट कांहीं कवनांत हल्लींच्या कॉलेजांतील युवायुवतींचाच मोळा अधिक खुलला आहे. अशा विसंगतीमुळें एकाद्या भिक्षुकाला झुंझारराव किंवा रानदांडग्याला विद्याधर म्हटल्याचा भास होतो. "मराठमोळा" ह्या मथळ्याचें एक कवन आहे. त्यांत तर अवास्तव स्तवन आहे. असें स्तवन म्हणजे बदनामीचा एक प्रकार होतो ! असो. ह्या प्रस्तुत प्रयत्नानें त्या जुन्या मोळ्याची चांगली आठवण होते, ही काय लहान गोष्ट नव्हे.

कवि म्हणजे कोण, ह्याविषयीं एक ओळ लिहीन तर अगदींच अना-

ठायीं ठरणार नाहीं. ज्ञानेश्वर म्हणतात 'शब्द सृष्टीचा ईश्वरु.' पण केवळ हें ऐश्वर्य म्हणजे काव्य नव्हें, कवि नुसता शब्दाचा चितारी किंवा रंगाचा रंगारी नव्हे. तो द्रष्टा, म्हणजे सामान्य माणसाला न दिसणारी सृष्टि त्याला दिसत असते. म्हणजे तो कोणी राक्षस किंवा अतिमानव असाही अर्थ नव्हे. बाळुत्यांत गुरफटलेलें सहा महिन्यांच्या आंतलें बाळही कवि होतें. अशीं तान्हुलीं केव्हां केव्हां निजलीं असतांनाही गालांतल्या गालांत सुंदर हंस-तात किंवा दचकतात. तेव्हां घरांतली आजीबाई मखलाशी करिते कीं त्याला सटवाई हंसवितें अगर रडवितें. हे बाळकाव्य जितकें खरें आहे तितकेंच वृद्धभाष्यहि खरेंच आहे. जें आम्हां मधल्यांना दिसत नाहीं तें बाळकाला दिसलें म्हणून हंशाच्या अगर रडण्याच्या मिषानें काव्य प्रकट झालें ! काव्याची व्याप्ति येवढी मोठी आहे. येवढेंच नव्हे, कवि 'द्रष्टाच नव्हे तर प्रत्यक्ष स्रष्टा आहे. ईश्वर भूतें निर्माण करितो तर कवि भाव निर्माण करितो. असें भाव निर्माण करावयाला अदृश्य ईश्वराला दृश्य कवींचे अवतार घ्यावे लागतात.

ज्या प्रस्तुत कवीनीं आम्हांला जुना मराठमोळा स्मरविला, ते उत्तरोत्तर आपल्या प्रगल्भ कृतींनीं अर्थसृष्टीचें ऐश्वर्य दाखवून आम्हांला प्रत्यक्ष ईश्वराचा साक्षात्कार देवोत हा माझा आशीर्वाद आहे.

एक गोष्ट सांगावीशी वाटतें, ती अप्रासंगिक न ठरो. " जुळेल कां सांग ग " तें इथेंच. अव्वल मराठींत कविता नुसती भक्तिरसानेंच रंगली होती. गंभीर सूर एकच लागला होता. तिची प्रतिक्रिया जणूं आतां चालू आहे. पूर्वी भक्तीचा एक तारा, तर आतां विनोदाचें तुणतुणें. पण वाद्य बदललें, तरी तार एकच असें कां ? मधून मधून शृंगार चमकतो, पण तोहि विप्रलंभाचा. अखेर त्याचाहि हुन्दो उडतोच ! हास्य हा आजकालचा मोक्ष ठरला आहे. मार किंवा मर, पण हंसत राहा. हा आजकालचा दंडकच होऊं पाहत आहे. कवीहि त्याचा मिंधा बनला आहे. अशा अतिरेकानें हंशाचेंहि हंसें होतें हें कधीं कळणार ! कविराया ! तुलाही हें

रहस्य कळलें नाहीं तर मग तूं आणि इतरेजन ह्यांत काय फरक ? शांत-रसाचा ठेवा; त्याला मानवी हृदय पारखें न होवो.

संपादकाचें आभार मानणें जरूर आहे. कवि प्रसिद्धीचा भुकेला नसतो. पण वाचकाची वाट काय ? हें वांसरूं आचलाला चिकटलें कीं कवीला नवीन नवीन पान्हे फुटतात ना ? मग संपादकाचें आभार कां न मानावेत ! कारण तोच गाईला वांसरूं लावतो. गाईला प्रसिद्धि नको, पण वांसरूं तरी लागतेंच नां ?

संपादकाच्या दावणीला आज जें विविध काव्यगोधन दिसतें, त्यावरून त्याचा सांठा ह्यांहून मोठा दिसतो. शिवाय एकेका कवीच्या एक दोन घोंटा-पेक्षां वाचकाला अधिक घेऊं न देण्याची संपादकाची कारवाई पाहून, त्यांचें लक्ष गाय किंवा वांसरूं ह्या दोघांकडे नसून, ‘ अलीकडच्या गवळ्याप्रमाणें आपल्या ( अर्थात् परोपकारी ) व्यावहारिक यशाकडेच अधिक आहे कीं काय अशी शंका येते. **मराठमोळ्यांत** भागिनींचा सूर ऐकून तर विशेष आल्हाद व आशा वाटत आहे.

इ. स. १९३३ सालीं मी दौऱ्यावर असताना यवतमाळ जिल्ह्यांत मला श्री. पांडुरंग श्रावण गोरे नांवाचा मराठा युवक भेटला. “ बोबडे बोल ” नांवाचा आपला छापील काव्यसंग्रह १९३२ सालीं प्रसिद्ध केलेला त्यानें मला दिला. तो मला इतका आवडला कीं कीं मीही बोबडा असतो तर बरे झालें असतें असें वाटूं लागलें. युवक इतका लाजरा दिसला कीं जणूं अलीकडच्या युवतीची सारी लाज त्याच्यांतच एकत्र झाली होती. असे ‘गोरे’ महाराष्ट्राच्या कडया कपाऱ्यांत किती तरी असतील. संपादक त्यांना हुडकून काढोत.

असो. ह्या नववधूला व वाचकवर्गाला यापेक्षां अधिक वेळ अडवून ठेवणें हा माझा अपराध होईल तेव्हां मी आटपतों.

राम—विहार
भांबुर्डा १२९२, पुणें ५.
७ जानेवारी १९३९.

— **विठ्ठल रामजी शिंदे.**

---



# 'वत्सला साहित्य प्रकाशन'

**आमचें वैशिष्ट्य:—**

- बहुजनसमाजास वाङ्मय वाचनाची गोडी लावणें.
- अप्रसिद्ध लेखकांचें मोलाचें लिखाण प्रकाशित करून त्यांस वाव व उत्तेजन देणें.
- ललितवाङ्मयाबरोबर भारदस्त वाङ्मय प्रकाशित करणें. किंबहुना भारदस्त व तात्त्विक वाङ्मयाचीच अधिक निर्मिति करणें.
- पुस्तक विकत घेण्याची आवड प्रत्येकांत उत्पन्न करण्याकरितां, पुस्तकाची किंमत शक्य तितकी अल्प ठेवणें.

— पहिलें पुष्प लौकरच बाहेर पडेल —

पत्रव्यवहाराचा पत्ता:— जयवन्त बाबुराव जगताप,

१२४८ शुक्रवार पेठ, पुणें शहर.

# अर्पणपत्रिका

आमच्या प्रेमळ मामी

कै० सौ० सोनुबाई शंकरराव शिन्दे

यांच्या पुण्यस्मृतीस हा पद्य-गुच्छ

अत्यन्त नम्रतेनें आणि प्रेमानें

अर्पण करीत आहे.

— जयवन्त

# मराठमोळा

संसारीं समरींहि सिद्ध मरणा योद्धा कदा जो न भी
ब्रह्माण्डांत अखण्ड गर्जत असा ज्याचा यशोदुंदुभी
रक्षी जो निजशील यत्न करुनी अंगें धनानें मनें
त्यांचा आज कुठें पराक्रमरवी ! ह्रो दैन्यवाणें जिणें १

सद्धर्मीं निजजीवितास वितरी जो नित्य सत्यव्रत
सुक्षेत्रीं दिनरात जो श्रमतसे कर्तव्यकर्मीं रत
वेची प्रेमळ चित्त वित्त अवघे जो कां परांच्या हिता
तो गंभीर सुधीर वीर विरला कोठें मराठा अतां ? २

स्त्रीदाक्षिण्य सदैव जागृत असे ज्याच्या मनो-मंदिरीं
प्रेमोत्कर्ष गुणाभिवृद्धि करण्या ईर्ष्या जया अंतरीं
ऐसा वैभव कीर्तिमंत अमुचा " मोळा मराठा " बळी
झाला सांप्रत जीवनार्थकलहीं कैसा पहा निर्बळी ! ३

याला काय उपाय होय म्हणतां साधोनि सच्छिक्षणा
आत्मानात्मपरीक्षणें स्वहृदया शोधा, सुधारा जना !

पुणें ९।१।३९ — सरस्वतीकण्ठाभरण.

---

# मराठमोळा



## १ शिवरायगीत

( चाल— तूं टाक चिरुनि ही मान )

उगवला सुदिन अजि फार । करा साचार
महाराष्ट्राच्या कलिजाचा शिवरायाचा जयजयकार ॥ ध्रु० ॥

आठवा तयाचें रूप,
आठवा तसाच प्रताप,
आठवा तसा साक्षेप,
मग म्हणा महात्मा ऐसा कधिं कां पुनरपि अवतरणार ? ॥ १ ॥

स्फूर्तिमान् पुढारी असले,
कां बनलां मग मागसले,
हें अशुभ विशेषण कसलें,
का मर्द मराठा हात कपाळावर ठेवुनि बसणार ? ॥ २ ॥

तो सिंहनाद ऐका रे !
द्वेषभाव विसरुनि जा रे !
ऐक्यानें पुढति सरा रे !
मग रायगडीच्या समाधिलाही समाधान होणार ! ॥ ३ ॥

—चि. द. घाटे.
( मुंबई )

## २ भगव्या झेंड्यास वंदन

असोत ध्वज मिरवित बहु अतुल वैभवा
भगवा झेंडाच अम्हा एक वंद्य हा ॥ धृ० ॥

वीरांनीं रक्त रंगि बुडवुनी तुला
भगवा हा त्यागाचा रंग अर्पिला
समरीं दैदीप्यमान मिळविलीं यशें
एकवटुन डोलतात जणुं तुझ्या मिषें

उंच उंच फडकत नभिं नित असा रहा
भगवा झेंडाच अम्हा एक वंद्य हा ॥ १ ॥

धृतिकृतिचे लीन पदीं वीर तूझिया
स्फूर्ति स्फुलिंग दिव्य एक तूं तया
काळाचीं घोर तशी प्राप्त घननिशा
तव बळेंच निर्दळून जोडुं निज यशा

दिव्य अरुण तिमिर घोर उजळितो पहा
भगवा झेंडाच अम्हा एक वंद्य हा ॥ २ ॥

असो नसो स्वातंत्र्यहि घन न विस्मृती
तव परि हो वितरून जनीं विक्रम–द्युति
स्फुरतिल मृत बाहु तुझ्या रज–स्पर्शनें
नाचतील कबंधही पूज्य दर्शनें

वितरो नाभिं मूर्त असे ओज कीं महा
भगवा झेंडाच अम्हा एक वंद्य हा ॥ ३ ॥

— शां. ब. चव्हाण.
( कोल्हापूर )

# ३ रक्ताचा सडा

( जाति— पाण्डव दिडकी )

मायभूमीसाठिं बोला रक्त कोणीं सांडिलें । दान देहाचें दिलें
ऐकुनी ज्या मावळ्यांची गर्जना ती गंभिर । चेवती सारे विर
शत्रुच्या अंगा सुटावा घाम तेव्हां भीतिनें । त्यास वाटे धिक् जिणें
फेकिलीं आकाशिं शीरें शत्रुचीं संहारुनी । रक्त त्यांचें प्राशुनी
वा लढावें, माजवावें शौर्य शत्रू मर्दुनी । जेरिला तो आणुनी
दृष्टि शत्रूंची दिपे अन् खड्ग देखुन नाचरे । कांपरे अंगीं भरे
सारख्या गारा पडाव्या पावसाच्या भूवरी । रक्तवाही संगरीं
वीर वीरांशीं भिडोनी प्रस्फुरोनी झुंजले । शौर्य त्यांचे आगळें
शत्रुचीं अर्पून शीरें तृप्त केलें देविला । लाविला भाळीं टिळा
अर्पिलीं स्वातंत्र्यसूर्या शीरकमळें हो कुणीं । वीरशत्रू कापुनी
आणि त्या रक्तें विणोनी रेशमाचा गोफहो । नाचविलाहो कोणिहो
राइराईवाणि केलीं मावळ्यांनीं खांडुळीं । धैर्य खचलें ना मुळीं
वाघिणींचे शोभले पटे परि ते लोपले । भ्याड किंवा जाहले ?
ठेवि धारातीर्थि देहा पूर्वीचा तो मावळा । प्रेतवत् कां जाहला ?
हत्तिशार्दूलाप्रमाणें शत्रुना दे टक्करा । भंगला वाटे हिरा
पार्थपुत्रासारिखे बालवीरांनीं अतां । सिद्ध व्हावें मृत्युला

— वि. म. घुले.

( संगमनेर )

# ४ माझा महाराष्ट्र देश

भीमा कृष्णा गोदा ह्यांनीं, पावन केलेला ।
सह्याद्रीच्या सहस्र शिखरीं, उन्नत झालेला ॥
शिवरायानें दिधला ज्यासि, उज्वल संदेश ।
सुख शांतीचा दाता माझा, महाराष्ट्र देश ॥ १ ॥

पुणें, पंढरी, पैठण ज्यासी, शोभा अति देती ।
करवीरादि क्षेत्रें जेथें, आनंदित करिती ॥
सिंह दुर्ग शिवनेरी ज्याचे, अलंकार शेष ।
सुख शांतीचा दाता माझा, महाराष्ट्र देश ॥ २ ॥

दिल्लीचा सम्राटहि जेथें, हतोत्साह झाला ।
संभाजीनें धर्मासाठीं, जिथें बळी दिधला ॥
मर्द मराठा वीरांचा हा, सुंदर भू देश ।
सुख शांतिचा दाता माझा, महाराष्ट्र देश ॥ ३ ॥

बाजी तानाजी वीरांनीं, शौर्यें रक्षियला ।
राघोबानें ज्याचा झेंडा, अटकेवरि नेला ॥
ज्याची कीर्ति दिगंत ऐकुनि, येतो आवेश ।
सुख शांतिचा दाता माझा, महाराष्ट्र देश ॥ ४ ॥

महादजी मल्हार होळकर, जिथें जन्म घेती ।
संताजी सूर्याजी जेथें, वीरगती जाती ॥

स्वातंत्र्याचा केला ज्यांनीं, एकचि जयघोष ।
सुख शांतिचा दाता माझा, महाराष्ट्र देश ॥ ५ ॥

राजनीतिचे भास्कर नाना, जन्माला आले ।
बाळाजी बल्लाळ वीरवर, होउनिया गेले ॥
ज्याच्या साठीं यांनीं केले, अनंत ते क्लेश ।
सुख शांतिचा दाता माझा, महाराष्ट्र देश ॥ ६ ॥

स्वराज्य हिंदी द्यावें आम्हां, ओनामा केला ।
त्या टिळकांच्या जयघोषाचा, नाद जिथें आला ॥
पाळी पोषी आम्हांला हा, अमुचा परमेश ।
सुख शांतिचा दाता माझा, महाराष्ट्र देश ॥ ७ ॥

— मोतीराम चौधरी.
( कराची )

# ५ पूजा

[ अभंग ]

तुझ्या पूजेसाठीं आलों मी दुरोनी
साहित्य घेऊनी यथोचित.
शिर हें आणिलें पदीं नमविण्या,
नयन पाहण्या रूप तुझें.
श्रवण कराया गुण-संकीर्तन
श्रोत्र हे योजून ठेवियले.
नामरस प्याया आणिली रसना
तियेची योजना त्याच कार्यीं.
हृदय आणिलें आसन कराया,
मानसाची शय्या तुझ्यासाठीं.
भावना आणिल्या पाळणा कराया,
कल्पना तशा ह्या झोके द्याया.
अश्रूंची योजना स्नान घालावया,
वारा घालावया उच्छ्वास हे.
चरण चुराया तुझे देवराया !
माझ्या करद्वयां आणिलें मी.
इतुकें साहित्य असोनी सांगाती
उणीव कोणती पूजेसाठीं !
विसरलों दवा, नैवेद्याची सोय !
आत्म्याविण काय अतां शेष !

— **कृष्णमूर्ति; कविरत्न.**
**( अमरावती )**

# ६ मागणें

( अभंग )

देवा तुझी कृपा मजवरी भारी
सदा मी भिकारी तुजपुढें
मनांतील आशा तूंच पुरवीता
सख्या तूंच दाता तुझ्यासम
देसी मज भिक्षा, येतां मी दाराशीं
जाहलों मिराशी ऐसा तुझा !
जन हे बोलती, जन्माचा अधाशी
" सदा देवापाशीं धांव घेतो "
कुणी म्हणो कांहीं मजसी टोंचुनी
परी मम मनीं एक चिंता
तुझ्या दारांतूनी फिरतां माघारीं
झाळी होत सारी रिकामी ही.
पाहिलें एकदां डोळे उघडोनी
पुरतें कळोनी आलें मज
अरेरे देवा माया ही लटकी
तळाशीं फाटकी झोळी माझी !
अजूनीहि येतो देवा तुझ्या दारीं
घेवोनिया करीं हीच झोळी
आणि तूंही देशी भिक्षा प्रेमें मला
देवा तूंही खुळा झाला कां रे ?

— सोपानदेव चौधरी.
( नाशिक )

# ७ देवाजी

( अभंग )

— १ —

ओढियाचें पाणी नदींत सांडितां
भेदाभेद आतां कोठें पाहूं ?
सरितेचें पाणी सागरीं सांडितां
भेदाभेद आतां कोठें पाहूं ?
सागराचें पाणी नदीचेंहि पाणी
एकचि नयनीं ज्ञात्यानाहीं !
परंतु दोहींचें करितां आचमन
फरक कळोन येतो मना.
स्थानपरिस्थिती भेदाचें कारण
नव्हेंचि सृजन माझ्या मना.
मी तूं देवाजी, एकाच कुळींचे
पातलें मनाचें समाधान.

*　　*　　*　　*

— २ —

गंगेचें जल गंगेशीं अर्पण
पदरीं तें पुण्य भाविकांच्या

तुझा हा देह तुलाचि अर्पण
माझा पदरीं पुण्य मुक्ततेचें
मी तूं देवाजी, एकाच कुळींचे
पातलें मनाचें समाधान

* * * *

— २ —

गुळाचा गणोबा, गुळाचा नैवेद्य
नाहीं भेदाभेद कळों आलें !
सरितेचें पाणी सागरीं सांडितां
भेदाभेद आतां कोठें पाहूं ?
जीवनाचा पाट शेतांत लोटला
गेली हो अवकळा त्याच ठायीं.
आत्मज्ञानपाट लाधला मजला
देव मी वेगळा नाहीं कोठें !!!
माझा मीच झाल्या देव, कोणा भजूं
सुमनें कोणा पुजूं सांगा माते !
मी तूं देवाजी, एकाच कुळींचे
पातलें मनाचें मुक्तपण !!!

— गंगाधर धनवटे.
(मुंबई)

# ८ महात्मन् !—

( मालकंस )

महात्मन् ! तुझें नाम येतां मुखी
उभें मूर्त पावित्र्य राहे मनीं !
गळे दंभ सारा नुरे मानही
मुके भाव जातात हेलावुनी !
सुखोर्मी मनामाजि येती किती
उभी राहती आसवें लोचनीं !
जणूं वाहते शुद्ध मंदाकिनी !
तुझा स्वार्थसंन्यास आलोकुनी
हरिश्चंद्र जाईल ओशाळुनी !
असो शत्रु वा मित्र सर्वांसही
गमे हर्ष त्वन्नाम--संकीर्तनी !
जगीं धन्य केली तुवा आर्यभूमी
तिच्या कंठिचा दिव्य तूं तन्मणी !
तुझें वंद्य चारित्र्य देवो अम्हा
सदा स्फूर्ति स्वातंत्र्य--संपादनीं !

— प्रो. वि. भि. कोलते.
( अमरावती )

# १ दुःखांत जन्मे सुख

काट्यामाजिं जसा गुलाब निपजे
दुःखांत जन्मे सुख

टाकीचे जरि घाव पथ्थर न घे
देवत्व त्या विन्मुख

नाहीं दुःखहि एकले न सुखही
ही सृष्टि दो मिश्रित

दुःखा मागुनि सौख्य येइ घरिं ना—
पाचारिता चालत.

— मुरार.
( पुणें )

# १० ध्यानांत ठेव नीट

ध्यानांत ठेव नीट तूं एकला जगांत
नाहीं करावयाला तुजला कुणीहि साथ

'माझा' कुणा न बोल हे फोल बोल सारे
सुखवावयास येथें कोणी नसे तुलारे

पुष्पें सुगंधि बघुनी मोहूनि जाइ जैसा
विनवीत भृंगराज पुष्पांस पाहि कैसा

नाहींच भेद मुळिंही भुंग्यांत मानवांत
स्वार्थी जगांत आहे चालू अशीच रीत

परि तूं भुलून जाशी क्षण लोभ दावि त्याला
म्हणशी फिरून आणि 'माझा सखा' तयाला

त्याच्याच संगतींत जातोच तूं भुलूनी
क्षण कांहिं या जगाला माया खरी गणूनी

मिथ्या परंतु सारे ध्यानांत ठेव नीट
ठेंचाळल्यावरी तूं गाशील हेंच गीत

-- शिवाजी खळतकर.
( दिग्रस बुद्रुक- नागपूर )

# ११ खुळ्या पांखरा !

ह्या उजाड माळावरी नसे आसरा । कशाला येशी खुळ्या
पांखरा ॥ ध्रु० ॥

तुझ्या सुखाचा मुलुख निराळा,
इथें सावळागोंधळ सगळा,
कद्‌र गुणांची नाहीं कुणाला,
जाई तुझ्या तूं घरा । कशाला येशी खुळ्या पांखरा ॥

टिपुस जलाचा नसे एकही,
घरकुल छोटें तिथेंच राही,
दुरूनि दुनिया सारी पाही,
शोधी सुखाचा झरा । कशाला येशी खुळ्या पांखरा ॥

तोडुनि सारे बंध प्रीतिचे,
विसरुनि नातें आपुलकीचें,
ठिकाण गाठी स्वातंत्र्याचें,
मारी भरारी जरा । कशाला येशी खुळ्या पांखरा ॥

— मा. कृ. शिन्दे. ( मिलिन्दमाधव )
( मुंबई )

# १२ हंसऱ्या तारकेस !

नभःप्रांगणीं चमचम चमकुनी हांसवि भू तारके !
मला कधीं हांसविशी चंद्रिके !

स्वेच्छेनें नव मोदानें गे ! विहरसि मधुमंगले !
तसे अम्हि राहुं कधीं ? निर्मले !

सांप्रतकाळीं सौख्य–सुम–कळी नष्ट जाहली गडे !
दैन्यता पाहुनि मन भडभडे

मांगल्याचा लोप जाहला स्वार्थाग्नी पेटला
ऐक्यता–सिंधु–झरा आटला

चालः— पावित्र्य–सुधा–रस विषमय कीं जाहला
सत्यता, नीति, यश–पंथ रिता टाकला
दुर्दैव–हलाहल–पवन पहा सूटला

आनंदीआनंद–सुदिन नव हिंदभूमिला कदा
येइ गे ! जाइल ही आपदा

— एल्. बी. नेरकर.
( दाताळा–वऱ्हाड )

## १३ रंगवि आंतिल रंग

कलावंता रे ! रंगवि आंतिल रंग
उठवुनि मनिंचें भावतरंग ॥ धृ० ॥

सुवर्णमंडित बेसुर बांसरि
अज्ञानें तुज दिली कुणी जरि
घे वेळूची सुरेल सत्वरि
डुलवि तियेनें लहरि भुजंग ० — कलावंता.

रसिकांची दे तृषा वाढवुन
येतिल सगळे आपण धांवुन
उंचावूं दे तव सिंहासन
ठेवि अढळ सकळां करि दंग ० — कलावंता.

मनांमनांतिल गूढें कळतिल
हृदयाला हृदयें ओळखतिल
खरे रसिकवर झेंप टाकितिल
तुज भंवती वनतील पतंग ० — कलावंता.

तुझी लेखणी, तुझी कुंचली
तुझा गळा, अन् तुझी देहुली
तुझी सुवाचा जितुकी झिजली
झिजव हृदयही तूं रसरंग ० — कलावंता.

बघुनी तव ही मोहक करणी
कौतुक केले जरि रसिकांनीं
वानितील निंदितील कोणी
बडवुनि दोहि कडूनि मृदंग ० — कलावंता.

— सोपानदेव चौधरी. ( नाशिक )

# १४ जीवित–पथ

( फटका )

जीवितपथिं या वाट चालती ।
वाटसरू हे किती तरी ॥
चढाओढ ही किती चालली
कोण जिंकितो पाहु परी ॥ १ ॥

कुणी चालले नेत्र मिटुनिया
अधोगतीच्या दरीकडे ॥
उत्कर्षाचे शिखर गांठण्या
कोणी ओलांडीत कडे ॥ २ ॥

उत्कर्षाचा मार्ग चालता
जोम येतसे धीरांना ॥
संकटगिरि ते सदा भिवविती
हताश ऐशा नादांना ॥ ३ ॥

पहा शूर हे तडक चालले
कर्तव्य–ध्वज करिं धरुनी ॥
कोण कोठुनी अद्‌भुत शक्ती
मार्ग तयांना दे करुनि ॥ ४ ॥

नैराश्याची निशा दाटली
जरी भोंवतीं घनघोर ॥
आत्मबळाची ज्योत तयांना
प्रकाश देई दूरवर ॥ ५ ॥

किती पसरले मोहजाल हे
मार्गी माया मोहिनिनें ॥
गुरफटले त्यामाजीं दुबळे
सज्जन सुटले शांतपणें ॥ ६ ॥

अहा ! शेवटीं विजयी ठरले
थोर महात्मे प्रभूपदीं ॥
कीर्ती त्यांची जगीं दुमदुमे
मोक्षाचा सांपडे निधी ॥ ७ ॥

— बालतनय.
( कोल्हापूर )



२

# १५ ध्वजारोपण

( शा. वि. )

भाग्याचा नव दीन आज जन हो,
हा पातला सत्त्वरीं ।
भेदाभेद त्यजूं करूं गमनहीं,
एकीसिमच्या तिरीं ॥
सुग्रासें नव अन्न सेवन करूं,
प्रेमांत काला करूं ।
जिज्ञासाघृत मेळवूं मग तयीं,
पात्रीं हृदीं कालवूं ॥ १ ॥
' दुष्कर्में न करूं ' असा ध्वज मनीं,
रोवूं बळें निश्चयें ।
' भावी वर्ष सुखी ' तयावरि अशी,
लावूं पताका स्वयें ॥
सत्याच्यापरिनें सदोदित जगीं,
वागूं अशी भावना ।
ठेवूं ठाम मनें हृदीं सतत या,
वागूंच यत्नें महा ॥ २ ॥

— मुरारीराम.
( जळगांव )

## १६ आई— !

( चाल— तीरथ कोन फिरे )

नव लाख दिवे हे तुझ्या घरीं
कां जातिस दुसऱ्यांच्या दारीं ॥ ध्रु० ॥

हा अनंत पसरला नीलिमा,
शांत गंभीर जयाची सुषमा,
विभूति ही प्रभुची निःसीमा
नांदतसे तव शिरावरी ॥ कां जातिस० १

धवल हिमाचल वर विस्तरला
अनंतामधें विलीन झाला
उदात्तरस शीकवी कवींला
बुद्धिस्थळिं तव वास करी ॥ कां जातिस० २

सामघोषमुखरित वनराई,
मधुनी जाई गंगामाई,
कलस्वनें तीं गीतें गाई
तव हृदयावरि निरंतरी ॥ जातिस० ३

अनंत दुःखें हृदयीं धरिलीं,
अनंत गूढें मनीं वाहिलीं,
अनंत कन्यारत्नें असलीं
प्रसवलीस तूं धन्य खरी ! ॥ कां जातिस० ४

किति कविंनी किति काव्या गावें !
किती तुझें वैभव वर्णावें !
किती तुझे जयघोष करावे !
वंदे त्वा मांगलेश्वरी ! ॥ कां जातिस० ५

— वि. द. घाटे.
( मुंबई. )

## १७ आशा !

( छन्द–पादाकुलक )

अवसेची घोर रात
गाळीतसे अश्रु–बिन्दू !
जगतसे आशेवरी
उद्यां येईल ना इन्दू ! १
करी शिशिर जर्जर
नच धरेला उसन्त !
जगतसे आशेवरी
उद्यां येतील वसन्त ! २
दुष्काळांत शेतकरी
ललाटीची पाहे रेघ
जगतसे आशेवरी
उद्यां येतील ना मेघ ! ३
विरहिणी ती कलिका
पहातसे दूरवर........ !
जगतसे आशेवरी
उद्यां येतील भास्कर ! ४
परी दारिद्र्यानें आत्मा
धरी देवाचें चरण !
जगतसे आशेवरी
उद्यां येईल मरण ! ५

— सुरेशबाबू.
(कोल्हापूर)

# १८ इशारा

( केशव करणी )

भल्या लेकरा कष्टानें तूं बघूं नको भिरी भिरी
घेइ तो असूड खांद्यावरी

नको करूं कंटाळा नेऊं नको आळसावर
बैल ते उधळतील चौखुर

जाडी भरडी वाकळ पांघर आपुल्या अंगावरी
मान तूं समाधान अंतरीं

त्या नकोत गाद्या गिरद्या लोळायला
ती मच्छरदाणी वरून सोडायला
ते पक्कान्नाचें ताट नको खायला

श्रीमंतीची खुळचट आशा नको धरूं अंतरीं
गोड ही कष्टाची भाकरी.

— सौ. नलिनीबाई शिंदे.
( पुणें )

# १९ मराठा

( मंदारमाला )

पोटास ज्याच्या मिळे एक वेळा सुकी कोरडी खायला भाकरी
केली इमानास जागून ज्यानें मराठी स्वराज्यामध्यें चाकरी
ज्याला रहायास साधीसुधी ती, असे खिडखोऱ्यामध्यें झोंपडी
हातावरी घेऊनी मस्तकाला रणीं झुंजला तो मराठा गडी !
आतां कुठें पूर्विंचा तो मराठा, जयानें स्वराज्यास संरक्षिलें ?
आतां कुठें तो, जयानें स्वतांचें असे रक्त युद्धांमध्यें सांडलें ?
कांडी फिरे यक्षिणीची कशी ही, यशोदेवता जाय देशोधडी
दास्यामध्यें गुंतला देश आतां, दडाला कुठें तो मराठा गडी ?
शेतामध्यें औत जुंपून आतां करी तो मराठा गडी शेतकी
झाली जरी पायबंदी तयाची, अशी सेवितो मायभू सारखी
स्वातंत्र्य जिंकून आणावयाला तयावांचुनी शक्त नाहीं कुणी
आतां असे लाभली योग्य संधी, पुढें येतसे अंग तो झाडुनी;
लागे दिसूं चेतलेला निखारा, निघूं लागली राख एकीकडे
ज्वालामुखी लागला पेट घ्याया, धडाडून बाहेर लाव्हा पडे;
लागे सरूं घोर अंधार आतां, फुटूं लागले तेज पूर्वेतुनी
स्वातंत्र्य नांदेल देशांत माझ्या, मराठाच आणील ते जिंकुनी !

— ग. ल. ठोकळ.
( पुणें )

# २० शेतकरी

दाभणकाठीं जाडेंभरडें धोतर गुडघ्यावरती
सर्वस्वाचें साधन, घेइ विळाकोयता हातीं.
भूमी ?— छे ! छे ! !— परंपरेनें आलेली श्रीमंती
गरिबीच्या गर्वाला फुलवी त्याची उघडी छाती !
गरीब ?— छे ! छे ! ! गरीब यातें म्हणेल जगतीं कोण ?
समाधान— चिंतामणि ज्याच्या दारीचा पाषाण !
इंद्र घालतो सडा अंगणीं झाडलोट करि वारा
चंद्रसूर्य राखती जयाच्या रात्रंदिन घरदारा.
मोत्यें दळते कणसामधले लक्ष्मी ज्याची रोज
सोन्याच्या विस्तवी थाटतो सैपाकाचा साज
सान मुलांच्या मधु बोलांचें अमृत ज्यानें प्याया
श्रीमंत जगीं कोण तयाहुनि विनम्रता यज्ञाया ?
श्रद्धा देवावरती, झटणें परार्थ रातंदिवस
उदार अंतःकरण, प्रेमी ज्याचा दृढ विश्वास
आशेचें साम्राज्य पसरलें अफाट जगभर ज्याचें
निधी तुझे सर्वही कुबेरा ! तुच्छ त्यापुढें साचे !
गर्भश्रीमंतानो ! तुमचा भाग्यविधाता हाच
रक्षण याचें करा ना तरी बसेल माथा टाच.

-- प्रो. वि. भि. कोलते.
( अमरावती )

# २१ ओवी कोणावर म्हणूं !

( चाल- आला खुशित समींदर )

लागे दळायासी पर । ओवी कोणावर । बाई पहिली म्हणूं ॥
ग मजला लागा कुणी तरि म्हणूं ॥ धृ० ॥

धरुनीया नांगर ईळभर ।
केली गव्हाचि शेतांत पेर ।
पिकला गहूं समद्या शेतभर ।
कापणि करून खळ्यावर । रास खंडीभर । रायाचे गुण किती म्हणूं ।
ग मजला लागा कुणी तरि म्हणूं ॥ १ ॥

रंग रायाचा गोरा गोरापान ।
डोइं मुंडासं तांबूस छान ।
पाटलावाणीच सारं ऱ्हाणं ।
मोठा राया उदार नर । मला परमेश्वर । भाग्याचि मजला म्हणूं ।
कीं माझ्या पतीस थोर मी म्हणूं ॥ २ ॥

मोट हाकीत असतां रानीं ।
गाइ राया गोड गोड गाणीं ।
घुमे आवाज शेतांतुनी ।

पाणि साऱ्या शेतावर । जाई भराभर । मोटेचं तें कुणुं कुणूं ।
ग देई रायास साथच जणूं ॥ ३ ॥

वाही शेतांत गार गार वारं ।
कणसांवरी येती पांखरं ।
गोफण रानीं फिरवी गरगर ।
राही उभा माळ्यावर । पांखरां करी दुर । कितीक गोफणि विणूं ।
ग मजला लागा कुणी तरि म्हणूं ॥ ४ ॥

दिवस आला लई आज वर ।
कव्हां जाऊं मी शेतावर ।
घेऊन रायाला माझ्या भाकर ।
राया पाणी तांब्याभर । देऊं कव्हां बरं । कव्हां पघूं ती तनू ।
ग बाई ! ओव्या किती मी म्हणूं ॥ ५ ॥

— दा. प्र. त्रिभुवन.
( पुणें )

# २२ मञ्जुळे तुजीच कुरपा बरं !

दाणंबी मुठभरं । नसायचं । दाणंबी मुठभर
तुज्याच पुण्याईनं झाली रास आज घरभर
मञ्जुळे तुजीच कुरपा बरं ! १

बलविन ग मैतर । जिवाचं । बलविन ग मैतर
वाडिन त्यास्नी पिरतीनं मग गरिबाची भाकर
मञ्जुळे तुजीच कुरपा बरं ! २

पिरत माज्यावर । तुजी लई । पिरत माज्यावर
म्हणूनश्यानी दिस ह्यो दिसला सोन्याचा लवकर
मञ्जुळे तुजीच कुरपा बरं ! ३

काम भराभर । केलं त्वां । काम भराभर
म्हटलं न्हाइस थण्डी– वारा ! तुला कुणाची सर
मञ्जुळे तुजीच कुरपा बरं ! ४

घाम कसा झरझर । यायचा । घाम कसा झरझर
इञ्जनावाणी काम तुजं परि चालायाचं वर
मञ्जुळे तुजीच कुरपा बरं ! ५

खाऊनिया भाकर । शिळीबी । येळला भाकर
दगडावानी रान–पांखरू माजं ह्ये कणखर
आणिक सरळ मनाचं बरं ! ६

जाड अङ्गावर । सुताडं । जाड अङ्गावर
जुन्यारबी फाटक कशाची तुला नसे खातर
स्वप्नांतबी नसे कुरकुर ! ७

तुजंच मोतीसर । साण्डल । तुजंच मोतीसर
म्हणून आलं मणी जुन्धळ्यांतुनी किती ह्ये वर
मञ्जुळे तुर्जाच कुरपा बरं ! ८

लक्शिम् पायावर । तुज्या ग । लक्शिम् पायावर
देवबि भाळल बगून ह्यो ग आम्चा सौसार
मञ्जुळे तुजीच कुरपा बरं ! ९

— सुरेशबाबू.
( कोल्हापूर )

# २३ लक्षुमी

( मुद्रिका )

हें गच्च दाटलं पीक वावरामधीं
फुलवरा असा कणसांना तरतरला नव्हता कधीं
हंतरली भुइवर जशी हरळ लसलशी
जोगुनी डुबकण्या घेती खाचरांत गाईम्हशी
लागला फुटूं जोरांत गहूं हरबरा
हा मुबलक दाणागोटा सरणार न वरसाभरा;
करवालिचा धरुनि हात मारगेसरीं
चढलीस घराची माझ्या तूं प्रेमानं पायरी
उंबऱ्यावरी तूं पाय टाकल्यावर
साजरं गोजरं सारं लागलं दिसाया घर
उतरला जवा विहिरींत तुझा पोहरा
लगि तुडुंब भरली पाणी, लागतो निमा कासरा !
शेतांत हळदिचा हात खपूं लागला
लागलीच त्यांना आली सोन्याची पिवळी कळा,
मार्तींत तुझ्या अंगचीं टिपं ठिबकलीं
ही कणसं बघ मोत्यांच्या ओझ्यानं भारावलीं;
तूं आल्यापुन काइबी न पडलं कमी
संपलं दाळिंदर माझं, उतरली घरीं लक्षुमी

-- ग. ल. ठोकळ-
( पुणें )

# २४ डांगोरा पिटणार

कृपा कधीं करणार ? दयाळा !

पाण्यावांचुनि पिकें न पिकती
कधीं पुरांनीं वाहून जाती
कितीक वर्षे दुष्काळांनीं—
असा जीव घेणार ? दयाळा !

किती गिळावे सदा हुंदके ?
नशीब का हें असेंच फुटकें ?
अश्रूंचे किति घ्यावे घुटके ?
तेहि कुठुनि येणार ? दयाळा !

रडुनि कोरडा कंठ जाहला !
अश्रूंचाही झरा आटला !
अन्नावांचुनि देह वाळला !
अधिक किती पिळणार ? दयाळा !

कच्चींबच्चीं कशी जगावीं ?
गुरेंवासरें कशी तगावी ?
डोळ्यांनीं तीं कशी बघावीं—
तडफडता मरणार ? दयाळा !

## मराठमोळा

कष्ट करावे तरीहि कांहीं
सार्थक त्याचें न होय मुळिंही
न्याय हाच का तुझ्या घरींही—
सांग खरा ठरणार ? दयाळा !

कष्टांचें फळ देइ पुरेपुर
तरीच मानूं तुजला ईश्वर
ठेवुनि दगडी मूर्ती नातर
डांगोरा पिटणार ! निर्दया !

— प्रो. वि. भि. कोलते.
( अमरावती )

## २५ गरिबांचें गाणें

गरिबांच्या रक्तानें जगती जगतीं श्रीमंतां धेंडें !
आणि पुन्हा जगतांत मिरवितीं घेऊनिया काळींतोंडें !

गरिबांचीं हाडें चेंचुनियां बांधिति जे मोठे वाडे
तेच हरामी त्यां वाड्यांतुनि गरिबांना फेंकति तुकडे !

गरिबांच्या कष्टांनीं बनली ज्यांची घी-शक्कर-रोटी
तेच उडविती मालपुवा, अन् गरिबां न मिळे लंगोटी !

गरिबांच्या जीवावरि ज्यांच्या मोटारी पोंऽपोंऽ करिती
त्याच राक्षसांच्या मोटारी गरिबांना नित चेंगरती !

गरिबांच्या खपण्यानें बनले ज्यांचे सरदारी सूट
तेच बड्या बापांचे बेटे गरिबांना मारिति बूट !

गरिबांनीं हा कोठवरी सोसावा जुल्मी अन्याय ?
सत्ता, मत्ता, विद्या, गरिबांना खाण्याकरितां काय ?

गुणवंतांनों ! धनवंतानों ! पुरे करा आतां चाळे !
आमुच्या जीवांवरती तुमच्या मौजा, हें आह्मां कळलें !

दीन-दरिद्र्यांचा नारायण हळहळला अन् कळवळला !
ह्मणोनि त्यानें ह्या गाण्यानें गरिबांना सन्देश दिला !

— कृष्णमूर्ति, कविरत्न.
( अमरावती )

# २६ गेली मावळून संध्या.... !

गेली मावळून संध्या नाहीं परत येणार !
वेडया उदास हृदया वाट किती बघणार !
शांत झालें चहूंकडे मूक झाला पक्षी—गण
पानांमधून वायूचें पहा थांबलें गायन !
दूर क्षितीजीं दिसती काळ्या तरूंच्या आकृति
गिरी-शिखरावरती आतां नांदनसे शांती !
शालू नेसूनिया काळा येत असे हीं रजनी
झोंपवाया जगताला मूक गायनें गाऊनी !
स्वप्न--भूमींत अजून वृत्ति तुझ्या विहरती
क्षणाक्षणास कासया पापण्या या ओलावती ?
गेली मावळून संध्या नाहीं परत येणार
वेडया हृदया माझिया वाट किती बघणार ?
येऊं लागल्या तारका बघ गगनीं हांसत
हांस हृदया माझिया करी हांसून स्वागत

— राजस.
( कोल्हापूर )



३

# २७ घाटमाथ्यावर !

( सुनीत )

होतों मी सहचारिणीसह उभा त्या घाटमाथ्यावर
सृष्टीचें अति भव्य रूप हृदया उत्साह दे केवढा !
खालीं खोल दरी भयाण, पुढती धिप्पाड मोठा कडा
खालीं जंगल दाट आणि वरतीं शोभे निळें अंबर !
सूर्याच्या पिवळ्या उन्हांत नटलीं कोठें गिरींचीं शिरें
कोठें शुभ्र जलौघ, दूर दिसती झाडींत कोठें पथ
धावे फुंकित शीट कर्कश दिसे घाटांत अग्नीरथ
जाती घालुनि शीळ भुर्र उडुनी केव्हां गुणी पांखरें !
जोडीनें पसरून पंख अपुलें तों क्रौंच पक्षीद्वय
जाई संथ हवेंत पोहत, किती तें दृश्य चेतोहर !
ओलांडून दरी निवांत बसलें पाषाणखंडावर
पाठोपाठ मनोविहंगाहि; असा लागून गेला लय !
तेव्हा मीं म्हटलें, " प्रिये कधिंतरी सोडून देहास या
आत्मे काय उडून जातिल असे स्वर्गास गाठावया ! "

— ग. ह. पाटील.

( पुणें )

# २८ हिंडावें रानोरानीं

( जाति– फुलवेल )

नदी होवोनी । हिंडावें रानोरानीं ।। ध्रु. ।।
धबधब उंचावरून यावें
पर्वत झाडें यांस बघावें
हळूहळू मग मोठें व्हावें
मौज करोनि । हिंडावें रानोरानीं १

मार्ग सांपडे तिकडे जावें
परी न अडकुन कुठें रहावें
झोपडि, खेडें शहर बघावें
सदा हांसोनी । हिंडावें रानोरानीं २

कुठें झुळुझुळू वाहत जावें
गुणगुण गुणगुण गाणें गावें
सूंसूं करीत पुढति पळावें
जनां भारोनि । हिंडावें रानोरानीं ३

फुलझाडें, फळझाडें कांठीं
पाणी प्यावें त्यांचेसाठीं
रोज तयांची घेउन भेटी
पुढति सरोनी । हिंडावें रानोरानीं ४

कधीं संथ, कधीं अति जोरानें
वाहुनि हमेश जन रंजविणें
हौशि जनांना पोहुं देणें
जळपुरवोनी । हिंडावें रानोरानीं ५

इतरांचा मळ गिळून घेणें
आणि तयांना स्वच्छ राखणें
जनतेला संतुष्ट ठेवणें
उडया मारोनी । हिंडावें रानोरानीं ६

— वि. म. घुले.
( संगमनेर )

# २९ सृष्टीचा संसार

सृष्टीचा संसार, सखे हा, सृष्टीचा संसार ॥ ध्रु० ॥

नाजुक लतिका बघ तरुभवतीं
पतीस नवती जशा बिलगती
प्रीतीची ही पाहुनि भरती
निराश प्राणी असेल कोणी होइल गारेगार ॥ १ ॥

मंद वायुच्या लहरी येतीं
कोमल पानें मजेंत झुलती
हर्षभरानें फुलें खिदळतीं
बालिश लीला कलिका बाला करिते वारंवार ॥ २ ॥

अर्धविकसिता ती फुलराणी
दंग बापुडी आत्मचिंतनीं
रविकिरणांनीं कुरवाळोनी
अधर चोखिले पुन्हा चुंबिले मग झाली गुलजार ॥ ३ ॥

इकडे कोणी वेडा प्राणी
गात सारखा रानोंरानीं
ऐकुनिया तीं प्रेमळ गाणी
भृंग–पद्मिनी गोडबंधनीं झालीं एकाकार ॥ ४ ॥

— मा. कृ. शिंदे, ( मिलिन्दमाधव )
( मुंबई )

# ३० आम्रवृक्षाचें गाणें

( चाल– तूं टाक चिरून ही मान )

[ आंब्याचें झाड लावणाऱ्यानें लावलेल्या झाडाचें फळ खाऊं नये असा दंडक रूढ आहे. त्याला अनुसरून प्रथमच बहरलेल्या आंब्याच्या झाडाखालीं एक वाटसरू आशाळभूतदृष्टीनें उभा आहे व आम्रवृक्ष त्यास खालीलप्रमाणें बोलतो आहे, अशी मनाची तयारी करून प्रस्तुत गाणें वाचकांनीं वाचावें. ]

ना धरी मनीं संकोच; साध तव हीत
'श्रमे एक, फळ दुजा भोगतो' हीच जगाची रीत ॥ धृ०॥

रसरसले आंबे पुरते
ज्यावरती दृष्टि न ठरते
पाहतांच जिभली झरते
परि उभा स्वस्थसा, तालवृक्ष जणुं; होशी कां भयभीत? १

लावणी धन्यानें केली
परि खाण्या बंदी पडली
भुरट्यांची चंगळ झाली
घे धुवुन हात जव वाहे गंगा; हीच असो तव नीत ! २

बहरला वसंतीं वृक्ष
कवि वर्णी प्रति–सुर–वृक्ष

वैभवीं झुले दिनरात
आधार देउनी मात्र राहिल्या सकल मुळ्या भूमींत ! ३

मुंग्यांचें नव वारूळ
नागाचें होतें बीळ
( सानांचे थोरच काळ )
‘ पंचमी ’ पुजोनी त्यास खुलवितां न्यायी बुद्धी चीत. ४

चंद्रिका विधूची प्यार
घन कज्जलसम शेजार
नर्तनें मुलवितो यार
चंदेरी मंदिल लेवुन फिरतो तिजसंगें ऐटींत. ५

घरघरतीं यंत्रें नाडें
मरमरुनी खपतीं हाडें
त्यावरती उठती वाडे
अन् त्यांत चालते चैन जिवांची ऐकूं ये संगीत. ६

तडतडुनी फुटती शीला
रविकिरण तापवी भूला
उरीं फुटुनीं मजूर मेला
त्या देहावरती महाल उठतीं रक्तांकित ज्या भिंत. ७

जीवाचे करुनी रान
शेतकरी पिकवी रान
दु:खास जणुं बलिदान
बलिदान करोनी पुण्यें जगवी मालक सतत खुषीत. ८

संपन्न राष्ट्र शेजार
डोळ्यांत सले अनिवार
घेऊन सर्वे दळभार
ऐश्वर्य भोगण्या त्यास चिराडितां गाती जन जयगीत. ९

एकानें दुसऱ्या लुटणें
दुसऱ्यानें तिसऱ्या कुटणें
शिष्टाई वर पांघरणें
लुटमार सुखाची दिवसाढवळ्या हीच जगाची रीत. १०

अन्याया फोडी तोंड
जीवावर येते धोंड
होईल तनु नउखंड
त्या फुटेल तेव्हां तोंड फुटो; रे, तूं बस फळ चाखीत. ११

-- गंगाधर धनवटे.
( मुंबई )

## ३१ " इंद्र–धनुष्य "

कमान ही गे कसली,
आई गे मजला दिसली;
रंगांत रंग बेरंग,
मति होई माझी गुंग ॥ १ ॥

रंग तांबडा पिवळा,
शोभतो जांभळा निळा
बहू मोद मनाला होई
उमजत मजला नाहीं ॥ २ ॥

हें कांहींच नाहीं बाळा,
हा इंद्र–धनुष्यीं चाळा,
दिसे तुला नाना रंग
परि असें जगाचे ढंग ॥ ३ ॥

कमान सात रंगाची
संसारीं सुखदु:खाची
ओलांडुनि तूं त्या जाशी
प्रार्थितें तया मी ईशाशीं ॥ ४ ॥

— वि. ना. शिरोळे.
( पुणें )

# ३२ तारे

( वृत्त–रसना )

गगनांत हे अनंत — तारे सुरेख शांत
पसरे प्रभा नभांत — गमती हिरेच कांत
कीं हे दिवे विजेचे — आकाश मंडपांत
वा ताटवा फुलांचा — फुलला ऋतू वसंत
नवनील शाल ओढी — झोपेंत सृष्टीदेवी
ही तेजगोल नक्षी — स्वर्गीय रंग खुलवी
गंगेत शुभ्र गगनीं — सुमनें तरंगतात
कीं दिव्य पुष्पवृष्टी — सृष्टींत नित्य होत
जंगी जवाहिराची — फुटली दिसेच खाण
उधळीत दिव्यतेजा — आले अनंत प्राण
डोळेच हे प्रभूचे — गगनांत तावदाने
उघडून देव पाही — सृष्टीस या कृपेनें
पणतीच पेटविल्या — देवा घरीं दिवाळी
अवकाळी पावसांत — गारांची रास पडली
कीं टाकसाळ झडली — पडली रुपेरी नाणीं
हें गूढ सोडवेना — थकली मदीय वाणी

— तु. बा. बेंडाळे.
( जळगांव )

# ३३ भटक्या कवी

( जाति—मञ्जरी )

मी उदास होउनि सहज मनाशीं म्हणे,
‘ ये मुषाफराचें कां हें नशिबीं जिणें ? ’
घरदार सोडुनी, प्रिया, लाडकी मुलें
हिण्डतों खुळा मी काय मला लाभलें ? १

किति विचार आले गेले हृदयान्तरीं
पांखरें जशीं चिंवचिंवती वृक्षावरी
विमनस्क होउनी चढलों मी टेकडी
सोडुनी श्वास चहूंकडे दृष्टि फेकली २

पश्चिमेस दिसला भटकत गेला रवि
ती म्लान मुखश्री मन माझें मोहवी
पाहिला नभीं मी मेघखण्ड हिण्डता
खग दिसला गिरक्या घेत तिथें एकटा ३

ये वाहत सरिता डोङ्गररानांतुनी
बागडतां दिसलीं निर्झरबाळें गुणी
हा वायु विचरतो भुवनीं वेडापिसा
परि तऱ्हेतऱ्हेचे सूर काढितो कसा ! ४

ग्रहमाला करिते भ्रमण रवीभोवती
सङ्गीत गूढ निर्मिते तयांची गती
सगळेंच विश्व हें गमे प्रवासी मला
खुललेली दिसते तरीच त्याची कळा ५

जाहले हिमाचे प्रळय, आर्य पूर्वज
ध्रुव सोडुन भटकत फिरले, स्मरले मज
या देवभूमिचा लाभ त्यांस जाहला
गाइले वेद, तें ठावें तुजला मला ६

ख्रिस्तादि महात्मे नसते जर भटकले
पाजळते कां जनिं धर्मदीप आपले ?
ते जगत्प्रवासी गल्बत हाकारुनी
भटकले; जाहले नव्या जगाचे धनी ७

तो आङ्ग्लकवी ज्या म्हणत ‘ सरोवर–कवि ’
गाइलीं तयांनीं निसर्गगीतें नवीं
तो अमेरिकेचा भटक्या कवि ‘ डेव्हिस ’
कां त्याची कविता भुलवी मम मानस ? ८

मग मीच कशाला विषाद मानूं तरी ?
भटकेन जगावर असाच जिप्सीपरी

हातांत शिदोरी, खिशांत कविता—वही
जाहलों प्रवासी बघावया ही मही। ९

त्या क्षितिजाजवळिल निळया टेकड्यांकडे
ही वाट जात घेऊन वळण वाकडें
तिकडेच निघालों वाजवीत पांवरी
या अद्‌भुततेची काय कथूं माधुरी ! १०

— ग. ह. पाटील.
( पुणें )

# ३४ प्रीतिची हुरहुर

— १ —

दारीं राहुनि उभी भिरिभिरी वाट तुझी पाहतें
प्रीतिची हुरहुर हृदिं वाटते !
हृदयिं उसळल्या प्रेमभावना अगम्य अन् नाजुक
बनविती चित्ता उन्मादक
ओष्ठपुटें स्फुरता ऐकाया आतुर मी होतसें
विसरूनी आत्मभाव जातसें
पाजवुनी प्रेमामृत मजला जीवन दे झडकरी
पालवी हृदयाशावल्लरी
पाहतें वाट तव आलोचन जागुनी
दिन कण्ठितसे कल्पनाजाल गुम्फुनी
हृदयीं दे आसरा धांव झणि वाट तुझी पाहते
प्रीतिची हुरहुर हृदिं वाटते !

— २ —

कशाला गेला नयनापुढुनी ? हृदयहि आकर्षिलें,
प्रीतिच्या मोहपाशिं ओढिलें
चाल किती तव मोहक, भाषण हृदयातें वेधिते
निरन्तर ऐकावें वाटतें
त्वन्मुखिचें मधुगान परिसता विहंगमाचे गळे

होउनी मूक थिजुनि राहिले
सस्मित मुख पाहुनी आपलें वेडी मी होतसें
जडतसे जीवपांखरा पिसें
तव नयनगोळ खेचिती हृदय बावरे
गुणवर्णन करिता शब्दविभव ना पुरे
फेक आपुला कटाक्ष मजवरि वाट तुझी पाहतें
प्रीतिची हुरहुर हृदिं दाटते !

— शशाङ्क.
( औन्ध )

# ३५ माळी – फुलमाळीण

मी माळी, फुलमाळिण तूं बाला
गुंफुं ग सुमनांची माला.
निशिगंधाचा गंध मनोहर
'बकुळी त्याच्याहुनि ती सुंदर'
गंधें, निजगंधें करि मोहित सकलाला ०— गुंफुं ग

मदनमस्त मोगरा कसा हा !
'नाजुक मालति जपते देहा'
डोलूं, चल डोलूं, अन् घालुं गळ्यांत गळा ०— गुंफुं ग

जाई–जुई आवळ्या जावळ्या
'सगळ्या मुलुखाच्या या भोळ्या'
राण्या, या राण्या शोभति प्राजक्ताला ०— गुंफुं ग

दरवळते ही इथें चमेली
'बोल बोलण्या सदा भुकेली'
वेडी, ही वेडी असलाच हिला चाळा ०— गुंफुं ग

चाफा इकडे बोलत नाहीं
'घुम्या हाच सदाचा बाई'
योगी, तो योगी धरितो म्हणोनि अबोला ०— गुंफुं ग

शेवंती खेड्यांतिल बाला
‘ सुवर्ण चांफा न मिळे हिजला ’
ठेवी, ही ठेवी त्या झेंडूवर डोळा ०— गुंफुं ग

गुलाब राजा बघ नवलाचा
‘ छे ग बाई तो कांट्याचा ’
कांटा, तो कांटा नच लागो बोटाला ०— गुंफुं ग

फुलवूं बगिचा
रमवूं रसिकां प्रेमभरें
मी माळी फुल माळिण तूं बाला
गुंफुं ग सुमनांची माला

— सोपानदेव चौधरी.
( नाशिक )



४

# ३६ आग्रह

रागव, रागव, अशीच रागव, लटक्या रागा धरी;
जाणतों प्रीति तरी अंतरीं ! ॥ ध्रु० ॥

कां फुगिर गाल तव प्रेमानें रंगलें;
बघ खळींत इवल्या प्रीतीजल सांठलें;
या अधरीं रुसव्या प्रेमबोल थबकले;
रागरंगिं अनुराग रंगला; सखये, रागा धरी;
जाणतों प्रीति तरी अंतरीं !
प्रेम लता ही रागलहरिनीं थरथरते साजरी
म्हणूं कां मुलखाची लाजरी ?
हीं फुलेंच फुललीं रंगी गालावर;
मृदु–गंध प्रीतीचा पसरे वाऱ्यावर;
कां अर्ध उमलली कलिका अधरावर ?
हांसुं नको सखि, अधर–भ्रमर मम गुंजारव–जरि करी;
जाणतों प्रीति तरी अंतरीं !

-- दिनकर द. पाटील.
( कोल्हापूर )

## ३७ आशेस—

ये धांवत ये सखये सदये । तव दर्शन दे अधिरें मन हें ॥
मुखचंद्रसुधा बघण्यां सजलों । रुसलीस परी कां सांग सखे ? ॥ १ ॥

मज छंद तुझा तूं लावुनिया । लटकीं माया त्वां दावुनिया ॥
अन् प्रेममधूरस पाजुनियां । अंतःर्ज्वाला कां चेतविल्या ? ॥ २ ॥

निद्रिस्त शांत मी श्रमिं असतां । तूं अवचित प्रगटुनि गे हंसता ॥
नयनां उघडोनि तुला बघतां । ओझरती दिससी तूं पळता ॥ ३ ॥

मज ध्यास तुझा नच आस दुर्जी । जग सर्व गमें वैराण अजि ॥
मत्प्राण तुझ्याविण आकळिला । सत्वर दे जीवनरस प्याला ॥ ४ ॥

तूं सुंदर वसनें लेवुनियां । नभिं उंच ढगावरि बैसुनियां ॥
चन्द्र चांदण्यां तुजभंवती । या दीनाची मग काय क्षिती ? ॥ ५ ॥

सोन्याचें सुंदर पंख तुझे । मी पामर येऊं कसा ग तिथें ॥
काया मम क्षिणली अंत न घे । ये, घेई भरारी तूं सखये ॥ ६ ॥

— बाबूराव अर्नाळकर.
( मुंबई )

# ३८ प्रेम आणि त्याग

( जाति–प्रणयप्रभा )

मम हृदय व्यर्थ तूं मोहविसी
कां शब्दजाल वाया विणिसी ?
मूर्तिमती तूं अमरसम्पदा
स्वप्नींहि न मज दिसे धन कदा
मीलन मार्गीं हीच आपदा
सोड हृदयिंची आस कशी !
कां शब्दजाल वाया विणिसी ? १

' कुलीन ' म्हणुनी तुजसि वर्णिती
' हीन कुलज ' मज वदुनि निन्दिती
कुलज–अकुलजा कशी संगती ?
प्रेमामृत सिंचन करिसी
कां शब्दजाल वाया विणिसी ? २

रत्नखचित मन्दिरीं बैसशी
प्रेमाचे मधुजाल गुम्फिशी
वनीं भटकतों सुख ना मजशी
हृदय कसें लाभे तुजसी
कां शब्दजाल वाया विणिसी ? ३

हेमजवनिका दूर सारुनीं
लोह शृङ्खला स्वीकारोनी
मम हृदयाची हो स्वामिनी
प्रगट करी तव धैर्यासी
कां शब्दजाल वाया विणिसी ? ४

टाक तुझी ती फोल मान्यता
त्यागुनि देई तुझी कुलिनता
सोड सम्पदा आणिक सत्ता
सुधांशु हो हृदयाकाशीं
कां शब्दजाल वाया विणिसी ? ५

प्रेम पाहिजे ना गे तुजसी
कशास शाब्दिक विलाप करिसी
आर्पिन हृदयींच्या धनराशी
दाव धडाडी आज कशी
कां शब्दजाल वाया विणिसी ? ६

— शशाङ्क.
( औन्ध )

## ३९ आसरा !

व्याकळून कधीं काळीं
येतां सखे ! तुजपाशीं
कवळून शीर माझें
तुंवा धरीलें ऊराशीं !
आणिक या भालावर
प्रेमभरें हळुवार
गडे तुंवा फिरविला
तुझा स्नेहाळ ग कर !
बिलगून तुझ्या ऊरीं
रहातां मी क्षणभर
ओसरला हळूहळू
माझ्या अंतरींचा भर !
उष्ण तुझ्या निश्वासांनीं
जीवा लाभला उबारा
झाल्या पुन्हा कंपाकुल
माझ्या हृदयींच्या तारा !
दाटलेलें तम सोरें
गेलें क्षणांत विरून
रम्य रात्र पौर्णिमेची
पुन्हा हांसली येऊन !
सुख–दुक्खामधीं सखे !
असा दिलास आसरा
तुजवीण एकटा हा
जीव होतसे घाबरा !

— राजस.
(कोल्हापूर)

# ४० पराप्रीति

कडाडुनि विजा किती तळपती नभाभीतरीं,
खुशाल टक लावुनी बघत बैसलों मी तरी !
खळाळकन तारका तुटुनि येत पृथ्वीवरी,
अजाण मन भाबडें तरिसुद्धां न भीती धरी !
गडाड घनगर्जना गगन भेदुनी टाकिते,
मुळीं न भय माझिया तरिहि मानसा दाविते !
परी रुसुनिया यदा नजर फाडुनी पाहसी,
तुझे नयन लाडके, निरखिण्या नसें धाडसी !
गमे विमल देवते, त्वादिय नेत्रविद्युल्लता,
करील क्षणिं खाक कीं मदीय जाळुनी हृद्गता !
नकार जरि लाधला विनतिला कधीं माझिया,
तरी न धजतो तुला अधिक शब्द सांगावया !

*　　*　　*

पराप्रीति असे खरी पुनित प्रेमला भावना !
मनास पटलें अतां खचित तीं नसे वासना !

— मा. कृ. शिन्दे ( मिलिन्दमाधव )
( मुंबई )

# ४१ लाडके ! राहिन मी तोंवर !

तिमिर भरे भेसुर ! भंवति जरि तिमिर भरे भेसुर !
उजळायाची तुझ्या अंगणीं उषा उद्यां सुंदर !
लाडके ! राहिन मी तोंवर !
शिशिर करी जर्जर ! मला हा शिशिर करी जर्जर !
चैत्र–शिंपणें उद्यां व्हायचें तुझिया देहावर
लाडके राहिन मी तोंवर !
हृद्वीणा बेसुर ! जहाली हृद्वीणा बेसुर !
फुटेल मधुरे ! कंठ उद्यां तुज, ऐकाया ते स्वर
लाडके राहिन मी तोंवर !
गाणें चेतोहर ! तुझें तें गाणें चेतोहर !
वठल्या जीवा फिरूनि एकदां आणिल गे मोहर
लाडके ! राहिन मी तोंवर !
ओघळतिल झरझर ! नयनिं या ओघळतिल झरझर !
वाहिन तुजला अमोल माझे ते मोत्याचे सर !
लाडके ! राहिन मी तोंवर !
पाहुनि डोळाभर ! भाग्य तव पाहुनि डोळाभर !
भरल्या नयनीं हांसत घेइन निरोप तव सत्वर
लाडके ! राहिन मी तोंवर !

-- राजस.
( कोल्हापूर )

# ४२ भावगीत

( रागः—देसकार. तालः— एकताल. )

बोल, बोल, बोल मधुर बोल बोल बाले ॥ ध्रु० ॥

जल, तरु, खग, विश्वगोल ।
गान—लुब्ध जीव सकल ॥
श्वसन त्यांत तव न विमल ।
भ्रांत चित्त झालें ॥ १ ॥

मुदित विश्व सकल झुलत ।
आमोदें गीत गात ॥
तुजविण परि शून्य गमत ।
मजसि आज बाले ॥ २ ॥

प्रेमाची प्रतिमा मनिं ।
ध्यात बसूं किति अनुदिनि ॥
सुख न मिळत तुजवांचुनि ।
प्रेममुग्ध बाले ॥ ३ ॥

दुःख शोक, विरहानल ।
सोसुं किती तूंचि बोल ॥

तळमळतां होय विकल ।
देह आजि बाले ॥ ४ ॥

लोटें हें नयनिं नीर ।
हृद्या किति देऊं धीर ॥
लोटुं नको मजसि दूर ।
अश्रुधार चाले ॥ ५ ॥

मजवरि जरि प्रेम अतुल ।
धांवुनि ये त्वरित जवळ ॥
गोड गोड बोल मृदुल ।
बोल, बोल, बाले ॥ ६ ॥

— म. बा. शिंदे. ( वासुदेवाग्रज )
( कोल्हापूर )

# ४३ सखीची फसवणूक

( चालः — आनंदी आनंद गडे )

सायंकाळीं कुंजवनी गीताचा ये मधुर ध्वनी
उषा बैसली सुखासनी लपत छपत कुणि मागोनी १

तिची समाधि भंगोनी नयनांतें घे झाकोनी
असली कसली ही चेष्टा सोडा सोडा मिठी अतां २

बघसि वृथा कां मम अन्ता शोभते न तुज निष्ठुरता
मिठि नयनांची जीं सुटली निरखुन पाही भंवतालीं ३

कर्णपथीं येती लहरी हास्याच्या कोठून तरी
दुष्ट तूंच ग मुलखाची रीत न बरवी चेष्टेची ४

म्हणुनि बोलवी सुहृदेला चमत्कार तो दिसे तिला
फसलिस आतां सखे कशी गंमत झाली ही खाशी ५

— सौ. नलिनीबाई शिंदे.
( पुणें )

# ४४ हृदयमंदीर

( सुनीतः — शार्दूलविक्रीडित )

बाले ! मोहक तूं नि त्याहुनि तुझें मंदीर हयतसुंदर ।
प्रेमाचा झुळझूळ वाहत सदा सन्नीध गे ! निर्झर ॥
मोती जे उडती तुषार फुटुनी ती रम्य शोभा खरी ।
वाटे पाहत राहवेच नुसती निःशब्द त्याच्या तिरीं ॥ १ ॥

गाई मंजुळ गान ते मधुरसें रात्रंदिनीं ऐकुनी ।
कोठेंही असला तरी डुलतसे हा जीव आनंदुनी ॥
प्रीतीची फुलवेलही तवसखें जोमांत फोफावली ।
येतां यौवनभार भाव कुसुमें सारींच उत्फुल्लली ॥ २ ॥

दाटे अंतरिं तो सुगंध भरुनी बाहेर चौंहींकडे ।
टाकी भारून मन्मनास अगदीं जाईन तेथें गडे ! ॥
जीवाचा जळता दिवा जळतसें त्या सारखा मंदिरीं ।
रत्नें सद्गुण माणकें दिपवती नेत्रांस त्या अंबरी ॥ ३ ॥

*　*　*

दारें तीं उघडी सताड घुसलों पाही जरा हिंडुनी ।
प्रीतीचा परमेश चोर ठरूनी तूं ठेविसी कोंडुनी ॥

— सांवळाराम.
( कोल्हापूर )

# ४५ तेव्हां आणि आतां

( वृत्त-पाण्डव )

लोपलें सौन्दर्य झाला काय हा माझा गुन्हा ?
ओसरें त्वत्प्रेम जें, कां हाय दैवीं ना पुन्हा !

* * *

ओढिता तूं अंचला हो गोडशा संवेदना
आज ना दृक्क्षेप, होती अन्तरीं या वेदना !
हासऱ्या दृष्टींत तुझ्या लोचनें जीं गुंतलीं
आज तीं निस्तेजलीं अन् आंसवांनीं दाटलीं !
हात कण्ठी घालिता, तूं स्नेहपाशें बान्धिलें
आणि आतां हात माझे दूर कां तूं लोटिले ?
शीर्ष वक्षीं ठेवितां, तूं स्नेहभावें चुम्बिलें
आज तेंचीं हाय लाथाडोनिया कां टाकिलें ?
नित्य ओष्ठींचो सुधा तूं सानुरागें प्राशिली
ती तुझ्या प्रेमाविणें रे शुष्क आतां जाहली !
चुम्बुनी आलिंगिलें जें, प्रेमसिन्धू ये भरा
आज दैवें माझिया कां ना उठे उर्मी जरा ?
बाहुपाशीं मी तुझ्या स्वर्गीय सौख्यें भोगिलीं
आज पेटे कां सहारा भोंवती ? ना साउली !

* * *

रूप ना तेतें परी मीं प्रेमभावें पूजिलें
लोपता मद्रूप कां तूं प्रेम सारे त्यागिलें ?

-- शशाङ्क
( औन्ध )

# ४६ सुनीता

( जाति–मञ्जिरी )

( १ )

गवताचा भारा आली घेऊन शिरीं
पेठेंत चालली विकावया सुंदरी,
खणखणा वाजती पायांतिल जोडवीं
मुसमुसे शरीरीं यौवनशोभा नवी;
टकमका पाहती लोक राहुनी खडे
कमरेस कोयती पाहुन जाती पुढें.

( २ )

हे अधर तुझे, छे ! हीं सागरपोवळीं
हे दात कशाचे ? — या मोत्यांच्या वळी,
श्वासांत गारवा समुद्रवारा जणूं
हे डोळे, तुज कां ‘ मीनाक्षी ’ मी म्हणूं ?
सागरासारखिच अथांग अससी सदा
नच कळे हृदीं तव हालाहल कीं सुधा !

( ३ )

तव अधरीं भरली द्राक्षांची माधुरी
रसरसलें यौवन टपोर घोंसापरी,
तव शीतल आलिंगनीं, वाटतें मनीं

मांडवाखालतीं बसलों सायंतनीं;
तव रूपाची मज पाजुनिया वारुणी
उठविलें गडे तूं मला माणसांतुनी.

( ४ )

तापांत गुंगुनी पडलों गादीवर
ती उशास होती बसली चिंतातूर,
लागली झोप मज, असेंच तिज वाटलें
वाकुनी मुखावर हळुंच ओठ ठेविले;
औषधें इतर तीं देतो मी फेकुनी
घेतले परंतु हे गुपचिप राहुनी.

( ५ )

“ मज नकोस देऊं ही मेथीची जुडी
ए भाजीवाली ! दे कवळी काकडी,
तुजपाशीं असतो माल चांगला, मुली !
देणार कोणत्या भावानें तोंडली ? ”
“ हे तरुणा ! जाई परत, हीं न तोंडलीं,
ही मिरची पिकुनी लाल लाल जाहली ! ”

— ग. ल. ठोकळ.
( पुणें )

# ४७ निष्कंटक गुलाब

" कांट्या वांचुनि तो गुलाब असणें, " कांता वदे, " मुष्किल "
" कांट्या वांचुनिही गुलाब निपजे " बोले पती मिस्किल.
" द्यूति द्यूतिहि ही लई दरवळे मोही मनातें अहा !
कोडें कां पडलें तुला जिवलगे ! मी सोडवूं कां ? पहा– "
तत्गालीं अधरें करुनि सलगी हांसोनि तो बोलिला
" कांट्या वांचुनि हा गुलाब गहिरा येथें कसा जन्मला?
तूतें मत्सर वाटुनी दडविला गालीं तया चोरुन—
किंवा तो फुलतो असाचि नवलें गालींच कांट्याविण. "
रोषानें लटक्या जरी दुर सरे ती लाजली हांसली
" थट्टा ही भलतीच कोण " वदली " गुलाबि कोडयांतली "
" गोविंदाग्रज टाकिजे नवतिचें कोडे गुलाबी जना–
जादू त्यांतिल गोड मी पटविली तीं लाडके, त्वन्मना.
ह्या निष्कंटक दो गुलाब कलिका गालीं सदा नांदती
ह्यांना एकचि जन्म, मृत्यु न कधीं योनी न अन्या गती
ह्यांचे मोल अमोल ना सरहि ज्या, स्वर्लोकिं ही पाहतां
ह्या होती परि लोल मुग्ध कलिका ऐहीक ओष्टामृता."

*　　　*　　　*

गालीं मोहन ते गुलाब फुलतां, आम्हां जरी पाहणें—
एकांती, परि दृष्टिलाभ सहजां, गालीं न चोरीविणें
जावोनी हलक्या पदेंचि अधरें गालीं मुका चोरणें
अन् तै मोहन ते गुलाब फुलती बिनमोल काट्याविणें

— मुरार.
( पुणें )

# ४८ जुळेल कां सांग ग !

[ एका कॉलेजकुमारीची प्रेमपत्रिका चुकून एका ह० भ० प० कवीच्या पत्त्यावर, गेली ! ह्या प्रेमपत्रिकेस मशारनिल्हे कवीनें खालील कविताबद्ध उत्तर पाठविलें ! ]

( जाति–गोकुळकान्हा )

तुझी माझी जोडी सखये, जुळेल कां सांग ग ! ॥ ध्रु० ॥
मला तुझा केव्हांतरी कळेल कां थांग ग !
तुझी तीनपेडी वेणी
फुलें गुंफिलेली मधुनी,
माझी शेंडी सनातनी !
जुळेल कां सांग ग ! ध्रु०

तुझी केशभूषणीं प्रीति
भांग–रेख नाजुक कलती,
माझी संजाबाची रीती !
जुळेल कां सांग ग ! ध्रु०

तुझ्या कुंकवाची टिकली
टांचणिनें तूं कोरियली,
टिळा--मुद्रा माझ्या भालीं !
जुळेल कां सांग ग ! ध्रु०

## मराठमोळा

कुडीं तुझीं हिरेदाणी
चमकतात चम् चम् कानीं,
माझ्या कानीं नागफणी !
जुळेल कां सांग ग ! ध्रु०

नेकलेस तो नाजुकसा
तुझ्या कंठिं शोभे खासा,
माळकरी मी पण्ढरिचा !
जुळेल कां सांग ग ! ध्रु०

कंचुकी तुझी वायलची
शिवण आजच्या फॅशन्‌ची,
माझी बाराबन्दी साची !
जुळेल कां सांग ग ! ध्रु०

तुझें पारदर्शक लुगडें
टांचलेलें जिकडेंतिकडे,
धोतरास माझ्या तुकडे !
जुळेल कां सांग ग ! ध्रु०

तुझ्या पायिं नाजुक वाहणा
शोभतीं पथीं जातांना,
माझ्या खडावांची दैना !
जुळेल कां सांग ग ! ध्रु०

तुझ्या हातीं पुस्तक–पेटी,
दुज्या करीं छत्री छोटी,
माझ्या हातीं चिपळ्या–काठी !
जुळेल कां सांग ग ! ध्रु०

तूं जशी सिनेमा--राणी
मी जसा अजागळ प्राणी !
तुझें--माझें एकठिकाणीं---
जुळेल कां सांग ग ! ध्रु०

— कृष्णमूर्ति; कविरत्न.
( अमरावती )

## ४९ दुसऱ्याची चिलीम !

करि माझा जिव बेजार
        ही कोण कुणाची नार ॥ ध्रु० ॥
लाजत अन् हो मुरकत बसली
प्रथमविठ्ठल ती मला भासली
म्हणुनि मनाला माझ्या ठसली
        वाटली जिवाला प्यार ॥ १ ॥
हळूच थबकत गेलों जवळीं
दृष्टिबाण फेकुनी सावळी
पातळ पालवि येण्या जवळी
        अन् भाव करि मजेदार ॥ २ ॥
भाव देखोनि हातीं धरलीं
चुम्बन घेतां परि कडकडली
गोळी जणुं कां घशांत घुसली
        ठसक्यानें झालों गार ॥ ३ ॥

*        *

प्रेमाची जे गाउन महती
परांगनांना रोखुनि बघती
लगट कराया जवळी जाती
        शोभा अशी खास होणार ॥ ४ ॥

— वी. मल्हारराव.
( भिलघडी - सातारा )

# ५० टोपी डोक्याची

नव परिणित वधुला–कुणी सखि-आली भेटीला
नव गृह नवतीचे–सखीला–दाखवि नाथाचें
फिरवी घरभरती–तियेला–मोदभरें लसती
येवुनि ओटिवर–तीस मग–बोले साचार
पुरुष इथें सगळे–ठेविती–कपडे ते अपुले

*  *  *

' गडे ! मला सांग—शिराणी—
कुणाकुणाची ग ? '

' टोपि ही कोणाची ?-हीच ना ?—
छोट्या भाऊजिंची '

' अन् ही कोणाची ? ' ' ही असे—
मधल्या दीरांची '

' बरं ही ग कोणाची ? अगे ही—
आहे डोक्याची '

' डोक्याची ' म्हणजे–कळे नच—
बोल मला तूंझे '

‘ डोक्याविण कोठें—घालती—
टोप्या इतर कुठें ? ’

‘ लाजलीस सखये — कांग तूं—
सांग त्वरित चल ये ’

‘ डोक्याची म्हणजे—इश्श् ! तुज—
पुसणे नच साजे ’

*    *    *

‘ डोक्याची ’ ‘ इकडे—तुझे गे—
कळले गूढ गडे ! ’

‘ तुझ्या हं डोक्याची– होय ना—
तुझ्याच स्वारीची ! ’

‘ थट्टा इश्श् गडे !—पुरे ही—
येईल कुणी इकडे ’

— मुषार.
( पुणें )

## ५१ गस्तवाल्याचा मुलगा

( जाति— भूपतिवैभव )

चांदणें फिकटलें, तिनकांडें मावळलें
तरि पाय आमुचे घरास नव्हते वळले १
लागल्या व्हावया लांब लांब तरुछाया
जणुं काय पसरितो भुताटकीची माया ! २
क्षितिजावर नव्हती अजुन चांदणी आली
पक्ष्यांची किलबिल सुरूहि नव्हती झाली ३
अद्याप जगाची निद्रा नव्हती सुटली
परि झोप अम्हाला निशाचरांना कुठली ! ४
चावडीपुढें रंगांत तमाशा आला
करि बहार ‘ शाहिर होनाजीचा ’ चेला ५
ऐकून ‘ लावणी गौळणिची ’ मन रिझलें
घटकाभर अमुचें स्मरण घराचें बुजलें ६
‘ धनि रामपारबी व्हाया नव्हं का आला ?
तांबडं फुटलं ’ धर्माजी बोलुन उठला ७
मग बोलत बोलत घरा परतलों आम्ही
परि कान ऐकती लल्कार्‍या त्या नामी ८
अंगणांत छाया दिसे घराची पडली
जणुं त्यावर त्याची मायापांखर जडली ९
त्यांतून प्रगटली एक चिमुखली मूर्ती
हळुंहळूं यावया लागे पुढतीं पुढतीं १०

थरकलें हृदय, थबकले आमुचे पाय
हा भुताटकीचा चमत्कार कीं काय ! ११
धर्माजी बोले, ' घ्या देवाचें नांव
भेटल तो, जर का त्यावर अपुला भाव १२
डावलूं नकाजी, बघा तरी न्याहळुनी
सांगुन का होते कधिं देवाची करणी ! ' १३
तों ' बा—बा बा—बा ' अशी बोबडी वाणी
ती बाळमूर्ति मग बोले मंजुळवाणी १४
आश्चर्य, भीति, हर्षाचें वादळ उठलें
क्षणभरच मनीं, मग संशय सारे फिटले १५
धावलों पुढें, ओरडलों, ' माझ्या बाळा ! '
पोटाशीं धरुनी घट्ट चुंबिलें त्याला १६
' तूं बालक होउन देवा देशीं भेटी
इतुकें का आहे पुण्य आमुच्या गांठीं ! ' १७
धर्माजी दुरुनी पडला त्याच्या पायां
गहिंवरुनी हृदयीं, लागे नेत्र पुसाया १८
तों सताड उघडें दिसे घराचें दार
माउलीस होती झोप लागली गाढ ! १९

— ग. ह. पाटील.
( पुणें )

# ५२ आई आम्हा आठवशिल ना ?

( चाल— तीरथ कोन फिरे हमारा )

[ आज भावी अभ्युदयाची आशा व खात्री वाटत आहे. राजा राममोहनराय, दादाभाई, रानडे या महात्म्यांना निराशेंत क्षुद्र स्वरूपाचीं कार्यें करण्यांत आयुष्य वेंचावें लागलें ! त्यांच्या आत्म्यांस आज काय वाटत असेल ? ]

आई ! आम्हां आठवशिल ना
स्वातंत्र्याच्या हिमालयावरि पुन्हा समाधी घेतानां ॥ धृ ॥
अंधारामधि खडा पहारा,
देत वेंचिला जन्महि सारा,
परि शुक्राचा प्रकाश अपुरा,
तोहि न दिसला नयनांना. १

जीर्ण चिरगुटें यत्नें अणिलीं,
आई ! लज्जा तुझी झांकिली,
हाय ! परी तीं अपुरीं झालीं
ढाळियलें मग अश्रूंना. २

स्वजनांचे उपहास साहिले,
परक्यांचेही क्लेश भोगिले,

परि जीवनरस सदा वाहिले,
मातें ! तव मंगल स्नाना. ३

बालपणांतिल तरल कल्पना,
तारुण्यांतिल प्रेम–वासना,
वार्धक्यांतिल धर्म–भावना,
समरस झाल्या तव चरणां ४

घडल्या असतिल चुका घडोत,
देह तुझ्या कारणीं पडोत,
प्राण तुझ्या पूजनीं रमोत,
जगतांना वा मरतांना. ५

— वि. द. घाटे.
( मुंबई )

# ५३ माझं बाळ

( चाल–चन्द्रकान्त )

सत्याची कीं सत्वाची तूं मूर्ती माझ्या प्रेमाची
नऊमास उदरीं होती मूर्ति माझ्या बाळेची
अवतरता ही बाळ अवतरे दुनिया आनंदाची
अगणित चाळे करून बाळे आशा पूर्ण मनाची १

तुझ्या नि माझ्या ध्यानीं नव्हती भीति क्रूरा काळाची
एकाकी मम बाळ निमाली--शोभा जगदुद्यानाची
घार झडपते जशी पिलाला कोंबडिच्या ग तशी तिची
विल्हेवाट लावली यमानें माझ्या सुंदर कलिकेची २

— सौ. सुशिलाबाई शिरोळे.
( पुणें )

# ५४ " मालुं मज नका "

[ देवालयांत शिरलेल्या हरिजन मुलीला पुजारी आंत शिरल्याबद्दल मारहाण करीत आहे; व ती मुलगी त्याची विनवणी करीत आहे. ]

( जाति – मुद्रिका )

कां फुका मला मालितां ? मालुं मज नका
मालणं योग्य हयं बाला, वाईच तली आइका !
देवळांत आले पली काय ही चुकी ?
पाहण्यां देवबापाला बंदि मज असें काय कीं ?
हातुनी गुन्हा कोणता सांग जाहला ?
सांगते खलं तुम्हाला अपलाध नसे जाहला
पोलास नको हा देव तली मालिता ?
देव हा थोल सल्वाना देवास सल्व सारखा
आइ वा बाप मज नसे, कोण ना मला—
म्हून कां मालिता तुम्ही ? देव हा लाखतो मला !
दाखवा दया मजवली, मालुं मज नका
हात मी जोडिते तुम्हा, जाईल देह हा फुका !
दोष हा काय जाहला म्हाल मी असे ?
उपजणें म्हाल जन्मीं वा, हातचें नसे !
देवास म्हाल वा थोल भेद हा नसे
मानवी जात ही त्याला ठाऊक फक्त हें असे
कां व्यल्थ मला मालिता येइना दया ?
एकदां भेटुंद्या देवा, शान्तवा माझिया जिवा !
हे प्रभो दीन रक्षका ! नेइ तव पदी
स्वल्गांत भेटण्या येते ' बंध ' हा नको मज मधीं !

— नाथ चव्हाण, ( कोल्हापूर )

# ५५ आशा

( दिंडी )

द्वितिय घटिका जव होति निशा जात
शिवाच्या मी पातलों मंदिरांत
तिथें येतां देखिलें दृष्य एक
कुवण अंधा हो गान गात मूक १

हाति होतां दिलरुबा आणि चाप
झटे बालाही काढण्या अलाप
दिलरुब्याला परि तंतु एक पाही
आणि चापाला कचहि एक राही २

पुण्यशीला सुंदरा चारुगात्रा
तंतु वाद्या वाजवी अंधनेत्रा
नाहिं त्यांतुनी जरि येत मुळीं नाद
भाव अंतरिचा उच्च घालि साद ३

याच वाद्यानें रिझवीन मी परेशा
अशी आहे तिज अजुनि दिव्य आशा ४

— एन्. आर्. चिपळूणकर.
( ठाणें )

# ५६ पवित्रतेची राणी

आनंदाच्या स्वैरहि नगरीं तूं एकटीच नांदसी
दुःखाच्या भयभीत सागरीं मी एकटी पोहसी
तुझीच सरली आशा प्रातःकालहि झाला तरी
अजून प्रगटे न कां सुखी दिन वाटे मम मन्दिरी १
जन निंदेच्या अफाट लाटा मजवरती आदळती
अगणित मासे मम हृदयाचा उगाच डवचा घेती
कोणाचीही कोण पोर ही केवढी झाली थोर
जन–गगनामधिं बहु मोलांची हीच चंद्र–कोर २
टकमक पाहाति भरति चेष्टां कितिक पामरां येती
लज्जास्पद होउनि मजला खाली पाहाया लावती
इकडे तिकडे, हूं, चूं, करण्या मजला झाली चोरी
आयुष्याच्या भाग्याची ही तुटली माझी दोरी ३
माझा आत्मा तळमळतो जणु खडकांवरती मासे
शांतसागरां दुर्गंधीची घाण सारखी मारितसे
मौनी मोठेपणा वसावा ताई मजला दोष नसे
पवित्रतेची राणी ऐसे जगताला मी सांगू कसे ? ४

— चि. ना. शिरोळे.
( पुणें )

# ५७ एक साधू

प्रभा पसरली रत्नांची
हीरक माणिक पाचूची
तयासि बघूनि वदे अहा
धनिकांच्या या गोष्टी पहा
मोल मजूरी जो करितो
हीरक माणिक पाचूतो
दृष्टीं तयाच्या कधीं तरीं
पडतो सांगा कुणीतरी
मुखीं तयाच्या मग ऐसें
येइल सांगा अहा ! कसें
कधिंकाळीं जरि नशिबानें
दिसलीं रत्नें नयनानें
मोह तयाचा ना पडतो
साधू मजला हा गमतो

— सौ. इंदिराबाई मुळे.
( रहेली–सागर )

## ५८ कलोपासक

जीवनांच्या सागरांत
कलेची ती होडी सान
वल्हवीतो प्रेमें कोण ? १
जीवनाची ती सरिता
कलेचा तो पूल छान
कोण जाई ओलांडून ? २
जीवनाच्या कुञ्जामाजीं
कला--पुष्पें तीं सुन्दर
कोण वेंची भराभर ? ३

जीवनाची मञ्जु वीणा
कलेच्या त्या मृदु तारा
कोण असे छेडणारा ? ४
जीवनाची ती समई
कलेच्या त्या नाना वाती
कोण पाजळीतो ज्योती ? ५
जीवनाच्या तरूंवर
फळें मधुर कलेचीं
कोण चाखी चव त्यांची ? ६

जीवनाच्या मन्दीरांत
कलेची ती रम्य मूर्ती
कोण करी पूजा--पूर्ती ? ७
जीवनाचें दिव्य गान
कलेची ती मधू तान
कोण जाई वेडावून ? ८

— सुरेशबाबु.
( कोल्हापूर )



६

# ५९ भातुकली

याग ! साऱ्या मुली मुली खेळ खेळुं या भातुकली ॥ धृ. ॥
भरा खेळणी खोप्यांत । बाहेर मांडु सोप्यांत ॥ १ ॥
किती चिमुकल्या गमतीच्या । चुली आमुच्या मातीच्या ॥ २ ॥
उठा कुठूनी तरी कुणी । आणा आर्धी जळण झणीं ॥ ३ ॥
बुंडुकली ती कांखेला । जाऊं चला ग पाण्याला ॥ ४ ॥
फूंक चूल तूं बसूं नको । धूर बने परि करूं नको ॥ ५ ॥
लुटूं पुटीचा फुरूं फुरूं । जाळ जाहला कसा सुरूं ॥ ६ ॥
डाळ कसी बाइ करपली । भता कभे ग उतर खालीं ॥ ७ ॥
भाकर भाजूं खरपूस । कुरूं कुरूं नी खायास ॥ ८ ॥
मांडुन पानें ठेवूं या । वाट जरासी पाहूं या ॥ ९ ॥
आईनें ती बाबाची ! । आम्ही केव्हां ? कोणाची ? ॥ १० ॥
इतुक्यातचि बाइ " तिकडची " । स्वारी नाहीं यायाची ॥११॥
दूर दूरशा बसूं नका । जातगोतही मानुं नका ॥ १२ ॥
सहभोजनचि असें बरें । आम्हीं करूं खरेंखुरें ॥ १३ ॥
उठा म्हणुंया फेरानें । भातुकलीचे हे गाणें ॥ १४ ॥

--सांवळाराम.
( कोल्हापूर )

## ६० गुढीपाडवा

नव वर्षाचा बहु हर्षाचा मंगलदिन पाडवा
तयाचा गाऊं गोड गोडवा

कर्तव्याच्या पवित्र आंगणीं आत्मोन्नतिची गुढी
उभारुं साधुं सुखाची घडी

गतकालांतिल पुण्याईचे अलंकार घालुनी
लेववूं तिला प्रेम — पैठणी

स्वधर्मनिरति मुकुट झळाळत गुणरत्नांकित शिरीं
भक्तिची भाळीं कुंकुम चिरी

अति शुभ्रयशाचा सुमनहार कंठिला
दशदिशीं तयाचा मधुर गंध कोंदला
आनंद समय हा आज सुभग पातला

कृपें जयाच्या — त्या ईशाच्या चरणीं देऊनि बुडी
सार्थकीं लावूं मानव कुडी १

आत्मसमर्पण जीवे भावें करुनी — नारीनरा
वाटुंया सत्कृतिची शर्करा

मराठमोळा

स्वानंदोत्सावें रंगुनि चित्रें स्मृतिच्या फलकावरी
रंगवूं भावि सुखाची बरीं

परमपदीं दृढ विश्वासाचे निशाण हृदयांबरीं
फडकवूं रक्षूं सर्वोपरी

निजमार्गे निश्चयें सुहिताचा चालुं या
संकटास धैर्ये एकवटुनि टाळुं या
समते—ममतेची सांगड भवि घालुं या

उदात्त ध्येया संपादुनिया मारुं निरंतर दडी
तिथें मग जिवाशिवाची गडी

—सरस्वतीकण्ठाभरण.
( पुणें )

# ६१ ही विजयादशमी आली

उत्साहें जनता भरली । ही विजया दशमी आली ॥ ध्रु० ॥
अंगांत शौर्य संचरलें । बाहुशिं स्फुरण हें चढलें ॥
जई पूर्व स्मृति हा झाली । ती विजया दशमी आली १
आलस्या सोडुनि द्यावें । चैतन्य पुनरपि यावें ॥
हा मंत्र कानिं जी वदली । ती विजया दशमी आली २
भेदांना विसरुनि जाहो । ऐक्याचें अमृत प्याहो ॥
हें सागण्यासि अवतरली । ही विजया दशमी आली ३
परवशता कलंक जावा । स्वातंत्र्य सूर्य उगवावा ॥
ही मनिषा मज सांगितली । ती विजया दशमी आली ४
दुर्दैव ओढुनि आलें । अणि शौर्य तेज लोपविलें ॥
परि परमेश्वर तो वाली । हा विजया दशमी आली ५
उत्थान हवें कां ? तुजला । मग लाग शीघ्र कार्याला ॥
ह्या वाणांतें जी वदली । ती विजया दशमी आली ६
विजयाचि असे जरि आस । धैर्याचि धरावी कास ॥
हे असे बोल जी वदली । ती विजया दशमी आली ७

--सौ. सुशिलाबाई चौधरी.
( कराची )

# ६२ संक्रांतीचा तिळगूळ

( मालिनीवृत्त. )

क्षितितलिं विचरे हा रुक्ष हेमंत–काल
तिमिर-युत-कु-रात्री दीर्घसूत्री विशाल
दिनकर धन-राशी लंघुनियां निघाला
त्वरित मकर-राशीमाजि येता जहाला १
जन अतिशय शीतें थोर संत्रस्त झाला
रवि-कर-निचयानें ताप तो दूर केला
प्रतिदिनि रवि– भा ती घेइ वर्धिष्णुते तें
इथुनि पुढति तेणें हर्ष होई जनांते २
सुदिन गणिति सारे थोर मोदोत्सवाचा
सकळजन मुखानें बोलती गोड वाचा
तिळ तिळ सरुनीयां घे रवी उत्तराशा
जन–मन रमवूनी वाढवी तत्सुखाला ३
गृहिं गृहिं तिळगूळा वाटिती सर्व लोक
जरठ, तरुण, बाला त्यापरी सान तोक
मम–सकल स्वजाती–बंधु मोदें तुम्हांला
तिळगुळ करिं देतों घ्या; मुखें गोड बोला ४

( शिखरिणीवृत्त. )

नये भेटीं घेतां, तिळगुण तुम्हातें म्हणवुनी
समर्पी प्रेमानें कविनिं, मनिं घ्या गोड करुणी
अविद्येचे जावो, तिमिर विलया विभ्रम सरो
मराठाज्ञातीतें प्रभुवर सदा सौख्य वितरो ५

— खं. ग. कालेकर.
( मुंबई )

# ६३ प्रार्थना

( दिंडी )

ओस पडलेल्या जीर्ण गृहीं जेंवी
स्वैर फिरतीं श्वापदें भुतें तेंवी—
मनीं माझ्या खिन्नशा निरुत्साहीं
नीच षड्रिपु--कुविचार शिरति पाहीं ! १

तेथ धिंगाणा करुनि वासनांशी
दुष्ट दवडिति ते झणीं विवेकासी
खुडुनि टाकिति अंकुरा सद्गुणांच्या
तशा कालिका कोमला भावनांच्या ! २

हृदयसरिंचे निर्मल — प्रेम — वारी
गढुळ करिती नाचुनी त्यांत भारी
स्वार्थबुद्धीच्या जालकीं वधीती
सत्यसंकल्पादीक मीन जाती ! ३

ासे मनुजा आणिती नीचतेला
प्रवर्ते तो मग निंद्य दुष्कृतीला
तयापासुनि सोडवी जगन्नाथा
प्रार्थि सदया ! दीन मी हेंच आतां ४

—सरस्वतीकण्ठाभरण.
( पुणें )

## ६४ कविवंदन—

पद ( राग- मांड, ताल- त्रिताल. )

वंदूं आनंदें कविवृंदा ॥
निर्मिति जे मधु काव्यमरंदा ॥ ध्रु० ॥

आदिकवी वाल्मिकि व्यासादिक ॥
संत—कवी प्रेमळ प्रासादिक ॥
विश्वबंधु, शारदा—उपासक ॥
राव रंक ना मानिति भेदा ॥ १ ॥

भूतदया प्रेरित कवि भाविक ॥
संसृति—सागरिं सत्पथ—नाविक ॥
काव्यविलासी नवरस—नायक ॥
देति सदा मनिं ब्रम्हानंदा ॥ २ ॥

— रा. आ. दोंदे.
( कराची )

# " मराठमोळा " मधील कवींचा
## — अल्प - परिचय —

**विठ्ठलराव दत्तात्रय घाटे**, एम्. ए., बी. टी., टी. डी. ( लंडन )

प्रसिद्ध कवि ' दत्त ' यांचे हे चिरंजीव. हल्लीं हे मुंबईभागचे एज्युकेशनल इन्स्पेक्टर आहेत. हे पुण्याच्या रविकिरणमंडळाचे सदस्य आहेत. ' मधुमाधव ' या पुस्तकांत त्यांच्या कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. यांची कविता थोडी असली तरी उदात्त व सरस आहे. यांच्या ' नवलाख दिवे ', ' तो पहा महात्मा आला ', ' गौरीशंकर आणि मानव ' इ. कविता उच्च प्रतीच्या आहेत. इतिहास हा यांचा आवडीचा विषय असून ' नाट्यरूप महाराष्ट्र ' हें यांचें पुस्तक विद्यार्थि वर्गांत अत्यंत प्रिय आहे. ' इतिहासाचा ओनामा ', ' नाना देशचे नाना लोक ' इ. शालेय पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. ' कांहीं म्हातारे ' हें पुस्तक लौकरच प्रसिद्ध होणार आहे. ' दत्तांची कविता ' यांनींच संपादित केली असून त्यांनीं लिहिलेलें ' दत्ताचें चरित्र ' भाषेचा एक उत्कृष्ट नमुना आहे. प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ व थोर कवि, म्हणून यांचा लौकिक आहे.

---

**सोपानदेव चौधरी**

खानदेशचे हे प्रसिद्ध कवि आहेत. हल्लीं हे ' नाशिक ' येथें राहात असून सुखवस्तु आहेत. यांचा ' काव्यकेतकी ' हा काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. यांची कविता गेय असून ठसकेबाज असते. यांचा आवाज गोड व पहाडी असून संगीत कलेचा व्यासंगही वाखाणण्यासारखा आहे. यांचें काव्यगायन म्हणजे संगीतरसाची मोठी मेजवानीच होय. हे आपल्या कविता जेव्हां

...न दाखवितात त्यावेळीं सभा चित्रासारखी तटस्थ व शांत असते, इतका यांच्या काव्यगायनाचा प्रभाव आहे. 'गोकुळिंचा कान्हा' या त्यांच्या गाण्यानें प्रथम रसिकांना वेड लावलें. यांची स्फुट कविता पुष्कळ असून ती लौकरच 'संपदा' या नांवानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध होणार आहे.

---

**प्रो. विष्णु भिकाजी कोलते**, एम्. ए; एल्. एल्. बी.

जन्म १९०८. नरवेल ( मलकापुर वऱ्हाड ). प्राथमिक शिक्षण मलकापूरास, हायस्कूल शिक्षण खामगांव येथें व कॉलेज शिक्षण नागपुरच्या मॉरिस कॉलेजांत झाले. इ. स. १९२५ व १९२९ मध्यें अनुक्रमें मॅट्रिक व बी. ए. च्या परिक्षा झाल्यावर १९३१ मध्यें नागपूर विद्यापीठाची एम्. ए. व एल्. एल्. बी. या पदव्या त्यांनीं मिळविल्या. एम्. ए. पहिल्या वर्गांत उत्तीर्ण होऊन दोन सुवर्ण पदकें मिळालीं. १९३१ पासून 'किंग एडवर्ड कॉलेज' अमरावती येथें मराठी विषयाचें अध्यापक आहेत. यांचीं पुढील पुस्तकें प्रकाशित झालीं आहेत. १ लव्हाळीं ( काव्यसंग्रह ), २ उद्धवगीता ( महानुभावीय काव्य ), ३ भास्करभट बोरीकर ( चरित्र व काव्यविवेचन ), ४ स्वस्तिक ( मित्रांच्या सहकार्यानें काव्यसंग्रह ), ५ मराठी दीपिका. शिवाय १ नरेंद्रकृता रुक्मिणी-स्वयंवर ( महानुभावीय काव्य ), २ श्रीगोविंदप्रभु चरित्र ( प्राचीन गद्यग्रंथ), ३ सोडचिठ्ठी ( दोन अंकी नाटक ) हीं तीन पुस्तकें लवकरच प्रसिद्ध होतील. याशिवाय महानुभाव वाङ्मयावर संशोधनपर असें बरेंच लिखाण मासिकांतून व वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालें आहे. कांहीं लघुकथा, टीकात्मक लेख व भाषाशास्त्रविषयक लेखही मासिकांतून आलेले आहेत.

---

## गणेश हरी पाटील, बी. ए., बी. टी.

पुणें जिल्ह्यांतील मंचर या गांवचे राहाणारे. यांचा जन्म १९०६ सालीं झाला. यांनीं फर्ग्युसन कॉलेजांतून बी. ए. ची पदवी संपादन केली. पुढें हे कांहीं वर्षें पुण्याच्या श्री शिवाजी मराठा हायस्कुलांत शिक्षक होते. तेथून ते बी. टी. झाले. हल्लीं हे पुणें जिल्ह्यांत असि० डे० एज्यु० इन्स्पेक्टर या हुद्यावर आहेत. 'रानजाई' हा यांचा काव्य-संग्रह प्रसिद्ध आहे. यांची कविता प्रासादिक, निसर्गवर्णनपर व भावमधुर आहे. 'शेवंती' 'हा कोण पुरुष', 'तिथें', 'लुटारूंचें गाणें', 'गस्त-वाल्यानें पाहिलेली स्वारी' इ. यांच्या कविता प्रसिद्ध आहेत. यांच्या कवितांत 'मराठी बाणा' ओतप्रोत भरला आहे. लहान मुलांसाठींही यांनीं कविता लिहिल्या असून 'बालशारदा' हा प्रसिद्ध कवितासंग्रह यांनींच संपादिला आहे. प्राथमिक शाळांसाठीं भाषाविषयाचीं क्रमिक पुस्तकें यांनीं संपादिलीं असून तीं 'मन्वतरवाचनमाला' या नांवानें प्रसिद्ध आहेत. यांचे 'गस्तवाल्याचीं गीतें' व 'रानजाईचीं फुलें' हें दोन संक-ल्पित काव्यसंग्रह असून ते लौकरच प्रसिद्ध होतील.

---

## गजानन लक्ष्मण ठोकळ, बी. ए., बी. टी.

जन्म १९०९, अहमदनगर. हल्लीं पुण्यास श्रीशिवाजी प्रेपरेटरी मिलिटरी स्कूलमध्यें शिक्षक. बी. ए., बी. टी. पर्यंत शिक्षण. बी. ए. पर्यंतचें कॉलेजचें शिक्षण बडोद्यास झालें. कविताविषयाला सुरवात करून १२ वर्षें झालीं. १९३२ सालीं मराठ्यांतील सुप्रसिद्ध कवींच्या जानपदगीतांचा प्रातिनिधिक संग्रह 'सुगी' या नांवानें प्रसिद्ध केला. एका नवीन काव्याच्या प्रकारचा पहिलाच संग्रह म्हणून त्याचें चांगलें स्वागत झालें. गेल्या वर्षी यांनीं

आपल्या स्फुट कवितांचा संग्रह ' मीठभाकरी ' प्रसिद्ध केला. जानपदगीत हा काव्यप्रकार नांवारूपाला आणण्याचें, आणि ' सुनीता ' हा सहा ओळींचा छोटेखानी काव्यप्रकार निर्माण करण्याचें श्रेय यांचेकडे जातें. नुकतीच यांनीं लघुकथा लिहायला सुरवात केली आहे.

---

## बालकृष्ण मार्तंड दाभाडे ( शशाङ्क )

जन्म–औन्ध, सन १९०९. शिक्षण बी. ए. पर्यन्त. हल्लीं औन्धहाय-स्कूलमध्यें शिक्षक. उत्तम कीर्तनकार व गायक. इ. स. १९२८ पासून काव्य करण्यास सुरवात केली. १ मालती ( काव्यसंग्रह ) १९३४, २ भारतीय चित्रकला ( प्रबन्ध )–मराठी भाषेंत पहिलाच सुंदर ग्रंथ, व व्ह. ट्रा. सो.; कोल्हापूर, बडोदें सरकारकडून बक्षिसें मिळालेला. ३ शशिकला ( काव्यमय नाटिका ), ४ त्याग (नाटिका), ५ मरीचिका, ६ वर्तिका ( गद्यकाव्यसंग्रह )–मराठींत हा काव्यप्रकार रूढ करण्याचें बरेंच श्रेय यांना आहे. ७ कलातरंग–ललितकलात्मक निबंधाचा एक अभिनवसंग्रह सर्व विद्वानांनीं एकमुखानें वाखाणलेला, ८ झंकाराचे पडसाद ( शिक्षणविषयक निबन्धांचा संग्रह ). याशिवाय 'भारतीय नृत्यकला', 'हलत्या सावल्या' हे निबन्ध-संग्रह लवकरच प्रसिद्ध होणार आहेत.

---

## डॉ. कृष्णमूर्ति; कविरत्न

यांचें नांव मद्रासी अथवा बङ्गाली पद्धतीचें दिसत असलें तरी ते महाराष्ट्रीय असून, त्यांचा जन्म वऱ्हाडप्रान्तांतील कोठा गांवीं इ० स० १९०९ मध्यें झाला. हिन्दुस्थानचे सर्व विभागांतून यांचा प्रवास झालेला असून, त्यांनीं मराठी भाषेंत गद्य–पद्यग्रन्थनिर्मिति पुष्कळ केली. इ० स०

१९२५ पासूनच त्यांचे लेख व कविता मराठी नियतकालिकांतून डोकावूं लागलीं. १९२८ मध्यें उमरावती येथें त्यांनीं 'इन्द्रधनुष्य' मासिक संपादिलें. त्याच सालीं 'तिचें पहिलें चुम्बन' नामक लघु कादम्बरी लिहून प्रसिद्ध केली. १९२९ मध्यें 'जननीचें शान्तवन' नामक काव्यपुस्तिका लिहून प्रसिद्ध केली. त्याच सालीं श्री. के० बी० देशमुखांच्या सुबोध ग्रन्थमालेच्या 'क्षत्रियांचा इतिहास' नामक विशाल ग्रन्थराजाचें त्यांनीं उपलेखक म्हणून लेखनकार्य केलें व ह्या ग्रन्थास चाळीस पृष्ठांची विस्तृत प्रस्तावना लिहिली. १९३२ मध्यें 'ब्रह्मद्वेषास उलट सलामी' नामक एक ऐतिहासिक कादम्बरी लिहून प्रसिद्धीली. १९३२ सालीं पुण्यास कविसम्मेलन झालें तेव्हांपासून त्यांनीं काव्यनिर्मितीकडे वळून १९३६ सालापर्यन्त भिन्न-भिन्न काव्यविषयांवर सर्व प्रमुख नियतकालिकांतून काव्यलेखन केलें. प्रसिद्ध कवितांचा त्यांचा सङ्ग्रह फारच मोठा होईल. महाराष्ट्रांतील बहुतेक नगरांतून त्यांनीं काव्यगायनहि केलेलें आहे. अलीकडील दोन वर्षांत 'नाथपन्थ' विषयक संशोधनपर ग्रन्थ लिहिण्याचें कामामुळें, त्यांची कविता तुरळक आढळूं लागली आहे. 'कृष्णमूर्तींची कविता' लवकरच प्रसिद्ध होईल.

---

## बंडोपंत सखाराम भोसले ( सुरेशबाबू )

जन्म १९१४ सालीं निपाणीस झाला. हे कोल्हापुरांतील 'राजाराम कॉलेजांत' ज्यू. बी. ए. च्या वर्गांत शिकत असून कॉलेजमध्यें निघणाऱ्या 'राजारामियन्' या त्रैमासिकाचे ते हल्लीं सम्पादक आहेत. यांनीं आजपर्यंत बऱ्याच कविता, नाटयछटा, लघुकथा व एकांकिका लिहिलेल्या असून कविता लिहिण्याकडे त्यांचा प्रामुख्यानें ओढा आहे. ज्योत्स्ना, प्रकाश, शालापत्रक, किरण, प्रमोद, मन्वन्तर, तरुण–भारत, बाल–सन्मित्र, राजारामियन्, चंद्रकला, पुढारी, वगैरे नियतकालिकांतून आणि 'नमन,' 'आज-

काळच्या मुली ' व ' गाजराच्या पुंग्या ' इत्यादि संग्रहांतून त्यांच्या ललित-वाङ्मय-कृति विखुरलेल्या दिसतात. ' हिंद-संगीत ' या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांतील त्यांचीं पदें रसाळ व अर्थपूर्ण असून त्यांची कांहीं पदें हिज मास्टर्स व्हॉईसनें ध्वनि-मुद्रित केलेलीं आहेत. लवकरच त्यांचा ' कुऽहुऽऽ ' या नांवाचा काव्य संग्रह प्रसिद्ध होणार असून नंतर ' ऊसाचे गरे ' हा त्यांचा नाटयछटांचा संग्रह प्रसिद्ध होणार आहे. त्यांची पद्य-रचना जितकी सोपी तितकीच रसपूर्ण असून त्यांच्या कवितेंत कल्पकता व प्रसाद हे गुण प्रामुख्यानें आढळून येतात.

---

## माधव कृष्णाजी शिंदे ( मिलिन्दमाधव )

सन १९२९ पासून लेखन व्यवसायास सुरुवात. आतांपर्यंत पुढील-प्रमाणें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेलें लिखाण व बरेंच वृत्तपत्रीय लिखाण यांनीं लिहिलें आहे. १ गांधीमहात्म्य ( म. गांधींचें ओवीबद्ध लघुचरित्र ), २ बंड-खोर कुमारी ( सामाजिक नाटक ), ३ गुंतागुंत ( सा. नाटक ), ४ गृहलक्ष्मी ( सा. नाटिका ), ५ गौडबंगाल ( सा. नाटिका ), ६ देवपूजा आणि इतर गोष्टी ( लघुकथा संग्रह ), ७ मोहनमाळ ( कवितासंग्रह ), ८ लैंगिक चर्चा ( निबंधात्मक ). शिवाय रेडिओसाठीं बरेच संवाद व ग्रामोफोन रेकॉर्डस्-साठीं अनेक गाणीं यांनीं केलीं आहेत.

---

## गणपत सखाराम भोसले ( राजस )

हे राजाराम कॉलेजांत इन्टर आर्टसच्या वर्गात शिकत असून यांना लहानपणापासून कविता लिहिण्याचा छंद आहे. यांच्या कविता आतांपर्यंत ज्योत्स्ना, वसंत, स्फूर्ति, मनोहर, पुढारी, राजारामियन्, पारिजात, सह्याद्री,

बलवन्त, प्रतिभा इत्यादि नियतकालिकांतून व 'महाराष्ट्र शारदा' भाग दुसरा 'शशिकला,' 'स्वातीचा पाऊस,' 'काव्य-सन्दोह,' 'सुगी,' 'छन्दो रचना' इत्यादि काव्य संग्रहांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या आहेत. 'सरू' या नांवाचें एक हृदयंगम खंड काव्य त्यांनीं लिहिलेलें असून लवकरच ते 'कृत्तिका' या नांवाचा एक भावगीतांचा संग्रह प्रसिद्ध करणार आहेत. लालित्यपूर्ण भाषा व अभिनव कल्पनातरङ्ग हेंच यांचें वैशिष्ठ्य समजावे लागेल.

---

## एम्. पी. कणसगिरी ( मुरार )

गृहभाषा कानडी असूनसुद्धां ज्या कांहीं थोड्याफार लोकांनीं मराठीची सेवा करण्याकरितां लेखणी उचलली त्यांत कर्नाटक व वाडिया कॉलेजमधून बाहेर पडलेल्या श्री. मुरार कनसगिरी यांचा उल्लेख जरूर करावयास हवा. त्यांच्या कविता अनेकविध विषयांवर असून त्या मराठींतील प्रमुख नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या आहेत. लघुकथा, लघुनिबंध, या वाङ्मयांतील शाखा उपशाखासुद्धां त्यांनीं हाताळल्या आहेत. त्यांची एक नाटिका 'मठाचा विचका' अप्रकाशित आहे. नोकरी व्यवसायांतून वेळ काढून केवळ हौस आणि नाद म्हणून ते साहित्यसेवा करीत असतात.

---

## विठ्ठल महादेव घुले, बी. ए; बी. टी.

जन्म १९०८. शिक्षक—पेटिट हायस्कूल, संगमनेर. 'सुगी,' 'काव्य-शास्त्रविनोद,' 'कलिका' या संग्रहांत व वाङ्मयगुच्छें व मन्वन्तरमाला या क्रमिक पुस्तकांत त्यांच्या कविता घेतल्या आहेत. जानपदगीतें व बालगीतें हें त्यांच्या काव्याचें वैशिष्ट्य होय. 'विजयगीत' नांवाचें गीत अक्कलकोट संस्थानांत सर्व शाळांतून प्रार्थनेच्या वेळीं, उत्सवप्रसंगीं व

दरबारप्रसंगीं म्हटलें जातें. ' चैत्रपालवी ' नांवाचा बालगीत संग्रह लवकरच प्रसिद्ध होईल. 'गुलाम' ही 'प्रसाद' मध्यें गोष्ट प्रसिद्ध झाली असून बाकीच्या मुलांच्या मासिकांतून मधून मधून प्रसिद्ध होतात. त्यांचें लक्ष प्रामुख्यानें मुलांच्या गोष्टीकडेच आहे. शिवाय कांहीं मोठाले टीकालेख वेगवेगळ्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झालें आहेत. दोनतीन वेळा महाराष्ट्रसाहित्य संमेलनासाठीं टीकालेख ( निबंध ) लिहून पाठविलें होतें. ' दादाचीं पत्रें, ' ' कांहीं नवीन उपक्रम ' ( मुलांसाठीं ) यासारखे वेगवेगळे लेख व शैक्षणिक विषयांवरही ते मधून मधून लेख लिहितात. सध्यां ' मराठी लेखन ' नांवाचें पुस्तक ( बदललेल्या अभ्यासक्रमानुसार प्रा० स्कू० ली० परीक्षेच्या मुलांसाठीं ) ते लिहीत आहेत.

---

## गंगाधर गणेश धनवटे

जन्म २० नोव्हेंबर १९०७. मूळ गांव पंढरपूर, जि. सोलापूर. प्राथमिक व दुय्यम शिक्षण पंढरपूर येथील व्हि. जे. हायस्कुलमध्यें. नंतर पुणें येथें फर्ग्युसन कॉलेजमध्यें उच्च शिक्षण. १९३२ सालीं बी. ए. ची पदवी मिळा-ली. सध्यां दादर येथें किंग जॉर्ज इंग्लिश स्कूलमध्यें शिक्षकाची नोकरी. गेले कित्येक महिने ' जगांतील कांहीं घटिका ' नामक कांहींसें कल्पित प्रवासवृत्त हप्तेबंदीनीं ज्ञानमंदिर मासिकांत चालू आहे. कांहीं पद्यें ज्ञानमंदिर व साहित्यसंग्रह या मासिकांतून प्रसिद्ध झालीं आहेत. रसचर्चा सारख्या विषयावर विचारात्मक प्रबंध ज्योत्स्ना मासिकांत प्रसिद्ध झाले आहेत. मौज, कुमार, प्रमोद इ. मासिकांतूनही निबंध, लघुकथा, कविता, परीक्षणें इ. प्रसिद्ध झालेलीं आहेत. यांची पुढील पुस्तकें लवकरच प्रसिद्ध होतील. १ हृदयगुंजन ( काव्यसंग्रह ), २ चित्रपट ( खंडकाव्य ), ३ इंद्रधनुष्य ( लघुकथासंग्रह ), ४ गौरीशिखराचा गौरव ( गौरी शिखरा-

वरील स्वाऱ्यांची हकिकत ), ५ जगांतील कांहीं घटिका ( काल्पनिक प्रवास-वृत्तांत ), ६ नवाकाळ ( कादंबरी ), ७ अजबखाना ( विविध लेखसंग्रह ).

---

## विठ्ठल नारायण शिरोळे, एस्. टी. सी.

ह्यांचा जन्म पुणें येथें झाला. मॅट्रीक पास झाल्यावर त्यांना कॅं. ए. सो. हायस्कूलमध्यें शिक्षकाची नोकरी मिळाली. लहानपणासून त्यांना छोट्या कविता करण्याची व काव्यगायन करण्याची भारी आवड. त्यांनीं नुकतेंच ‘ मुंबई ते कलकत्ता, ’ प्रवासरूपी पुस्तक लिहून वाङमयक्षेत्रांत पदार्पण केलें आहे. कविता करण्याचें स्फूर्तिदायक नेतृत्व प्रि. प्र. के. अत्रे यांचें त्यांना लाभलें आहे. ‘ पंचारती ’ या नांवाचा काव्यसंग्रह ते लवकरच प्रकाशित करणार आहेत.

---

## गणपतराव बापुजी शिंदे ( सरस्वतीकण्ठाभरण )

जन्म शके १८०५, मार्गशीर्ष शुद्ध ४. शिक्षण—यु. एस्. एफ्. पर्यन्त. व्यवसाय–सरकारी नोकरी, पुणें ( शेतकीखातें ). यांची बहुतेक कविता विविधज्ञानविस्तार, काव्यरत्नावली, मनोरंजन, मराठामित्र, महाराष्ट्र वाग्विलास, शिक्षक, सह्याद्रि, चित्रमयजगत् इत्यादि मासिकांतून व केसरी, सुधारक, दीनबंधू, विजयी मराठा वगैरे साप्ताहिकांतून प्रसिद्ध झालेली आहे. अमुद्रित काव्यसंग्रहहि बराच आहे. यांच्या काव्य व वाङ्मय-विषयक आवडीविषयीं कविवर्य अनंततनय यांनीं आपल्या ‘ शारदादूतिका ’ काव्यांत “ तेंवि सरस्वतिकण्ठाभरण प्रियकर त्याचा मित्र

रसवेत्ता बहु चतुर विलक्षण सद्‌गुणशालि पवित्र ”

असा उल्लेख केला आहे. यांना ब्राह्मधर्मासंबंधीं विशेष आवड असून ते पुणें येथील कौटुंबिक उपासनामण्डळाचे सभासद आहेत.

## शंकर बळवंत चव्हाण ( किशोर ) बी. ए.

जन्म १० एप्रिल १९०३. जन्मगांव करवीर संस्थानपैकीं जांभळी. शाळेंत असल्यापासून कविता लिहीत असत. ‘ किशोर ’ या टोपण नांवानें बऱ्याच मासिकांतून कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. पैकीं कांहीं निवडक कविता ‘ काव्य किशोरी ’ व ‘ मधु—मालती ’ या काव्यसंग्रहांत एकत्रित करून प्रसिद्ध केल्या आहेत. त्याशिवाय ‘ शीलसौभाग्य ’ या नांवाचें नाटक व ‘ भावलहरी ’ या नांवाचा गद्य काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. ‘ तेजस्वी तारा ’ या नांवाचें ऐतिहासिक नाटक छापत असून लौकरच प्रसिद्ध होईल. अलीकडे ‘ पुढारी ’ वगैरे साप्ताहिकांतून गोष्टी लिहीत असतात. हल्लीं करवीर संस्थानांपैकीं पन्हाळापेट्यास मामलतीचे जागीं आहेत.

---

## मल्हार बाळकृष्ण शिंदे ( वासुदेवाग्रज ) बी. ए.

जन्म तारीख २६ सप्टेंबर १९०२. जन्मगांव कोल्हापूर. १९३२ सालांत राजाराम कॉलेजमधून बी. ए. झाल्यावर महाराणी लक्ष्मीबाई गर्ल्स हायस्कूल-मध्यें इंग्लिश व मराठी विषयाचे अध्यापक म्हणून त्यांना घेण्यांत आलें. सातारचे सुप्रसिद्ध वकील कै० दादासाहेब करंदीकर यांना संक्रांतीची भेट ही यांची पहिलीच कविता अत्यंत आवडली. तेव्हांपासून काव्यलेखनास सुरवात झाली. नंतर आर्यसमाज गुरुकुल येथें संगीत शिक्षक म्हणून असले-वेळीं “ आर्यपद्य पंचदशी ” हें पद्यपुस्तक छापलें. १९३१ मध्यें ज्यु. बी. ए. मध्यें असतांच “ रसवंती ” नांवाचें काव्यसंग्रहाचें पहिलें पुस्तक प्रसिद्ध झालें. या पुस्तकाचें प्रकाशन काव्यरत्नावलीचें संपादक कै० ना. न. फडणीस यांनीं केलें असून प्रस्तावना प्रो. डी. एल्. गोखले यांनीं लिहिली आहे. पुस्तकास अनेक वाङ्मयसंस्थांकडून रोख बक्षिसें मिळालीं असून प्रमुख वृत्त-

पत्रांचे उत्कृष्ट अभिप्राय आहेत. येथील काव्यगौरव-मंडळांतील प्रमुख सदस्यांपैकीं हे व कवि ' संराक ' हे असून मंडळांतर्फे लवकरच दुसरा एक कवितासंग्रह प्रसिद्ध करणार आहेत.

---

## मुरारी रामजी चौधरी ( मुरारी राम )

यांचा जन्म सन १८९९ मध्यें भालोद (ता. यावल पू. खा.) येथें झाला. सन १९२२ सालीं मॅट्रिक झाल्यावर त्यांनीं भालोद येथें इंग्रजी शाळेची स्थापना केली. तींत सहावर्षे शिक्षकाचें व सेकंडरी एज्युकेशन सोसायटी, भालोद हिच्या सेक्रेटरीचें काम केलें. या त्यांच्या सुरुवातीच्या शाश्वत प्रयत्नानें ही शाळा हल्लीं एक उत्तम तऱ्हेचें हायस्कूल म्हणून प्रसिद्ध आहे. सन १९२७ सालीं आठ-दहा महिने त्यांनीं ' आत्मोद्धार ' पत्राच्या सहसंपादकाचेंही काम केलें. सन १९२८ सालांत श्री. फकिरा हरी लेवा बोर्डिंग हाऊसचे सुपरिंटेंडेंट म्हणून त्यांची निवड करण्यांत आली. आजतागायत तेंच काम ते करीत आहेत. पुणें येथील 'महाराष्ट्र कृषिवल' मासिकांत त्यांचे शेतकीविषयक अनेक लेख प्रसिद्ध झाले आहेत. सन १९२३ सालीं शारदाविषयक पद्य पुस्तक ' सरस्वती पद्यावली ' त्यांनीं प्रसिद्ध केलें. नागपूर येथील उद्यम मासिकांत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या शेतकी विषयांच्या लेखांचें स्वतंत्र पुस्तक ' कृषिप्रक्रिया ' उद्यमच्या संपादकांनीं १९३० मध्यें प्रसिद्ध केलें. हल्लीं ज्ञानमंदिर मासिकांत त्यांचे कृषिविषयक लेख प्रसिद्ध होत असतात. हे लेखक असून कविही आहेत. त्यांचे वाङ्मयविषयक लेख व कविता इतर मासिकांतूनही प्रसिद्ध झालेल्या आहेत. शारदादेवीसंबंधीं संपूर्ण माहितीचें पुस्तक ' साहित्य शारदा ' सन १९३७ मध्यें त्यांनीं प्रसिद्ध केलें. त्यावरून त्यांची भाषा साधी, सरळ व परिणामकारक आढळून येते. कवितेंतील त्यांचा विषय जिव्हाळ्याचाच असतो. सन १९३६ च्या

नोव्हेंबर महिन्यांत त्यांनीं 'विजय' वर्तमानपत्र, शेतकऱ्यांच्या सर्वांगीण चळवळीस चालना देण्याकरितां, स्वतःच्या जबाबदारीवर सुरू केले आहे.

---

## शं. ब. भोंसले ( बालतनय )

जन्म १९०२. वयाच्या सोळाव्या वर्षापासून यांना कविता करण्याचा नाद असून, त्यांच्या कविता किर्लोस्कर, भावसंगम, सत्यवादी, सेवक, पुढारी इत्यादि नियतकालिकांतून प्रसिद्ध होत आल्या आहेत. 'कुरुक्षेत्रांतील' सुंदर पदें यांचींच आहेत. प्रासंगिक कविता रचण्यांत यांचा हातखंडा आहे. 'अंत्यजांचा पाळणा', 'श्रीशाहूमहाराजांचा पोवाडा', 'श्रीशिवजन्माख्यान' हीं यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. 'बालतनय' या टोपणनांवानें हे प्रसिद्ध असून, कोल्हापूरचे 'राजकवि' अशीहि यांची ख्याति आहे. हे 'सेवक' पत्राचे सहसंपादक होते; व सध्यां 'पुढारी' चे मॅनेजर आहेत.

---

## दिनकर द. पाटील

जन्म १९१५. लघुकथा व प्रबंध या लोकप्रिय वाङ्मयप्रांतांत जरी हे सध्यां रमत असले, तरी काव्यरचनेपासूनच यांच्या साहित्यसेवेचा प्रारंभ आहे. बहुतेक प्रमुख नियतकालिकांतून यांचें विविध लिखाण प्रसिद्ध झालें असून, 'सांजवात,' 'करवीराच्या कळ्या' व 'प्रसाद' या कथासंग्रहांतही यांच्या कथा समाविष्ट झाल्या आहेत. 'खळ्या आणि आंठ्या' ( निबंधसंग्रह )— हें यांचें आगामी प्रकाशन असून, 'चंद्रकोर' हें खंडकाव्य सध्यां ते लिहीत आहेत.

---

## चं. स. अनोळकर

यांच्या लघुकथा, प्राविण्य, समाज सुधारक, मन्वंतर, सत्यकथा, यशवंत वगैरे मासिकांमधून प्रसिद्ध होत असतात. पद्यनिर्मितीपेक्षां कथालेखनाकडे त्यांचा विशेष ओढा असून घरगुती कौटुंबिक चित्रें वास्तवतेनें चित्रण करण्याची कला त्यांना चांगलीच साधली आहे. लघुकथाखेरीज त्यांनीं 'अस्सल नवमतवादी' व 'सुशिक्षित बेकार' ह्या नांवाच्या दोन नाटिका लिहील्या असून, त्या फार लोकप्रिय झालेल्या आहेत. यांचा लघुकथांचा संग्रह लवकरच प्रसिद्ध होणार आहे. सध्यां ते 'मराठा' मासिक काढण्याचें विचारांत आहेत.

---

## मोतीराम सीताराम चौधरी

यांचा जन्म १८९८ सालीं वऱ्हाडांतील उमरावती जिल्ह्यांत एका खेडेगांवीं झाला. ते कराची म्युनिसिपालिटीमध्यें एक मुख्याध्यापक असून तेथील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते म्हणून प्रसिद्ध आहेत. यांचें मॅट्रिकपर्यंत शिक्षण झालें असून ते थर्ड इयर ट्रेन्ड आहेत. याशिवाय त्यांनीं पंजाब विश्वविद्यालयाची 'हिंदी प्रभाकर' ( Honours in Hindi ) ही परीक्षा दिली असून गुजराथी व उर्दू व्हर्नाक्युलर फायनलची परीक्षा पास झाले आहेत. त्यांनीं इंग्रजी मध्यें 'A way to freedom' आणि 'High way of happy home' गुजराथी 'आर्य समाजनुं काम' आणि 'कर्तव्य दर्पण,' हिंदीमध्यें हम गुलांम क्यों? आणि 'आर्य समजका प्रचंड प्रचार' व मराठीमध्यें 'महाराष्ट्रांत मराठ्यांचें महत्त्व' हीं पुस्तकें लिहिली आहेत. हिंदी व गुजराथी भाषेंतील मासिकें आणि वर्तमानपत्रें यांमध्यें त्यांचे लेख कविता प्रसिद्ध झाले आहेत. कराची व कराची बाहेरच्या मराठी वृत्तपत्रा-

मध्येंही त्यांचे लेख प्रसिद्ध होत असतात. ते हिंदींचे पहिल्या प्रतीचे वक्ते असून कराचींतील सुप्रसिद्ध समाजसुधारक व हरिजनांचे कार्यकर्ते म्हणून त्यांची गणना होते.

---

## खंडेराव गणपतराव कालेकर ( सरस्वती तनय )

यांचा जन्म तारीख ३ जानेवारी सन १८८६ रोजीं मुक्काम पाटस येथें झाला. पुणें–सोलापूर रस्त्यावर पाटस हें रेल्वेस्टेशन आहे; तेथें त्यांचे वडील स्टेशनमास्तर होते. यांचा मूळ गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील करंजाणी हा होय. हा गांव दापोली तालुक्यांत असून दापोली–पालगड सडकेवर दापोलीपासून पांचवे मैलांवर वसलेला आहे. यांनीं वयाचे सोळावें वर्षीं कविता रचण्यास आरंभ केला. शाळेंत असतांना संस्कृतमध्यें पहिला नंबर येऊन त्याबद्दल ‘ सुभाषितरत्न भांडागारम् ’ हा ग्रंथ बक्षिसादाखल मिळाला होता. सन १९१२ सालीं सोलापूरचे प्रसिद्ध व्यापारी कै० मल्लाप्पा बसाप्पा वारद यांचें कविताबद्ध चरित्र रचिलें. त्यास परीक्षण कमिटीनें पहिल्या नंबरचें बक्षिस दिलें होतें. त्याप्रसंगीं सुमारें १२५ पेक्षां अधिक कवींनीं प्रयत्न केला होता. यांनीं स्फुट कविता बरीच लिहिलेली असून ‘ सरस्वतीतनय ’ या नांवाखालीं ती प्रसिद्ध केलेली आहेत.

---

## रघुनाथ गोविंद चव्हाण ( नाथ चव्हाण )

काव्य, लघुकथा, लघुनिबंध लिहिण्याची आवड वयाच्या सोळावे वर्षा-पासून लागली, आणि सतरावे वर्षी त्यांच्या ‘ कोकिळेस, ’ ‘ संक्रमण ’ या कविता व एकदोन लघुकथा मासिकांतून प्रसिद्ध झाल्या. यांच्या लघुकथा

साप्ताहिक प्रभा, भाग्योदय, ज्ञानमंदीर मासिकांतून प्रसिद्ध होत असतात. लवकरच ' जीवन नृत्य ' नांवाचा लघुकथासंग्रह प्रसिद्ध होईल.

---

## मल्हार भाऊराव भोसले ( बी. मल्हारराव )

जन्म १९१४. भिलवडी शाळेंत शिक्षक. १९३५ पासून लेखनाला सुरु-वात. बहुतेक लिखाण ग्रामीण जीवनावर आधारलेलें. लघुनिबंध सरस वठतात. आतांपर्यंत मन्वंतर, सह्याद्रि, ध्रुव, वैश्ययुवक, धनुर्धारी वगैरेंतून चाळीस लघुनिबंध व तितक्याच लघुकथा प्रसिद्ध झाल्या आहेत. तसेंच ' राजयोगी ' नांवाची कादंबरी दामोदर सांवळाराम कंपनीकडे परिक्षणासाठीं पाठविली असून सध्यां ग्रामीण जीवनावर ' सेवाधर्म ' नांवाची कादंबरी लिहीत आहे.

---

## तुकाराम बारसू बेंडाळे

खान्देशांतील यावल तालुक्यांत सांगवी या खेडेगांवीं १९०३ मध्यें यांचा जन्म झाला. हल्लीं हे जळगांवच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें चित्रकलेचे शिक्षक आहेत. यांचा १२५ पानांचा कवितासंग्रह कवि गिरीश यांच्या गोड प्रस्तावनेसह ' काव्यसंजीवनी ' नांवानें प्रसिद्ध आहे. ' स्वातंत्र्याचा झेंडा ' व ' निसर्गाचें नवल ' हीं पुस्तकेंही पद्यरूपानें प्रसिद्ध आहेत. यांच्या कवितें-तून शेतकऱ्यांचें जीवन प्रतीत झालेलें आहे व त्यांनीं निसर्गावर बरीच कविता लिहिलेली आहे. सिंहगडाविषयीं यांचें तीन हजार ओळींचें ' सती ' या नांवाचें खण्डकाव्य लवकरच प्रसिद्ध होईल. जळगांव साहित्य सेवामंडळाचे हे उत्पादक असून एक प्रमुख कार्यकर्ते आहेत.

---

## रामचंद्र आत्माराम दोंदे

शिक्षण—एलिफस्टन हायस्कूल व वुइल्सन कॉलेज, मुंबई. मराठी कवितांचें वाचन व संस्कृतवाचनाचा विद्यार्थीदशेपासूनच नाद असल्यामुळें साहित्यिक विषयांची आवड उत्पन्न होऊन संगीत नाटकें लिहिण्याची प्रवृत्ति झाली. यांनीं वयाच्या विसाव्या वर्षी पहिलें नाटक संगीत 'दुर्मति–निरसन' लिहिलें. दुसरें सन १९११ सालीं सामाजिक नाटक संगीत 'श्रीमती' लिहिलें. तें नाट्यसम्राट कै० केशवराव भोंसले यांस पसंत पडलें होतें. नंतर त्यांच्या आग्रहावरून, खास ललितकलादर्श संगीत मंडळीकरितां पौराणिक नाटक संगीत 'मदालसा' हें लिहिलें. तें बरेंच लोकप्रिय होऊन त्याचे यशस्वी प्रयोग १९१२ ते १९२० पर्यंत सतत आठ वर्षे झाले. जबाबदारीच्या मोठया नोकऱ्यावर ठिकठिकाणीं जाणें झाल्यामुळें हा व्यासंग चालविण्यास वेळ पुरा पडेना. तथापि कवितालेखन नेहमीं चालू असे.

---

## एल्. बी. नेरकर

राहते गांव इलिचपूर असून हायस्कूल व कॉलेजचें शिक्षण अमरावतीला झालेलें आहे. सन १९२७ मध्यें कॉलेज सोडल्यावर बुलढाणा जिल्हा कौन्सिलच्ये देखरेखीखालीं असलेल्या माध्यमिक शाळेंत शिक्षकाचें काम करीत आहेत. कविता करण्याचा व नाट्यछटा लिहिण्याचा व्यासंग बरेच दिवसापासून सुरू असून मनोरंजन, स्फूर्ती, वऱ्हाड–शाळा–पत्रक, मुलांचें मासिक, शाला–पत्रक, व्यायाम, कुंजविहारी, सेवक, राष्ट्र–सेवक, प्राविण्य, विद्यार्थी वगैरे मासिकांतून आजपर्यंत बऱ्याच कविता आणि नाट्यछटा प्रसिद्ध झाल्या आहेत.

---

## निवृत्तिनाथ रावजी पाटील. ( सांवळाराम )

जन्म १५ जुलै १९१८. जन्मस्थान—गोटखिंडी, जिल्हा सातारा. श्री. विठ्ठल सखाराम पागे बी. ए. एलएल्. बी. वकील, कऱ्हाड; हेच आद्यगुरु होत, व त्यांनींच वाङ्मयाची गोडी लाविली. घरच्या अत्यंत गरीबीमुळें आजपर्यंतचें सर्व शिक्षण ( इंटर आर्टस् ) मेजर दादासाहेब निंबाळकर, पर्सनल सेक्रेटरी टु हिज् हायनेस् यांच्या आश्रयामुळें झालें. सत्यवादी, सेवक, नवजीवन, पुढारी, राजाराम हायस्कूल मॅगेझिन् व राजाराम कॉलेज मॅगेझिन वगैरे नियतकालिकांतून व मासिकांतून कविता प्रसिद्ध होत असतात. त्यांची ‘ काळा गुलाब ’ ही कविता प्रसिद्ध आहे. लवकरच ‘ कंदमुळें ’ या नांवाचा समग्र कवितांचा संग्रह पुस्तकरूपानें प्रकाशित होईल.

---

## शिवाजी निलकंठ खळतकर

रा. ब. निळकंठराव खळतकर, ऑनररी मॅजिस्ट्रेट, दिग्रस यांचे हे चिरंजीव. जन्म बेळगांव जिल्ह्यांत ता. १९ जुलै १९१६ ला झाला. नागपूर येथील मॉरिस कॉलेजांत इंटरमिजिएटपर्यंत शिक्षण घेतल्यावर त्यांनीं आपलें लक्ष शेतीकडे वळविलें. लिखाणास अगदीं अलिकडे सुरवात केली असल्यानें लेखनप्रसिद्धि बेताचीच आहे.

---

## नारायण रामचंद्र चिपळूणकर

मूळगांव – गोरेगांव ( कुलाबा ). जन्म ३१ मे १९१५ रोजीं कल्याण येथें झाला. १९३८ त बी. जे. हायस्कुलांतून मॅट्रिक परीक्षा दिली. सध्यां ते Sydenham College of Commerce and Economies मध्यें

पहिल्या वर्षात आहे. यांचें बरेंच लिखाण अप्रकाशित आहे. संधि येतांच त्यांचें प्रकाशन ते करीत असतात. मुद्दाम प्रसिद्धिसाठींच लिहावें असा यांचा उद्देश लिखाणाचें मुळाशीं मुळींच नसतो.

---

## दा. प्र. त्रिभुवन

यांचा जन्म १३ मार्च १९१५ रोजीं बेलापूर–अहमदनगर येथें झाला. नोकरीचा व्याप पाठीमागें असतांही हे अधूनमधून कांहींतरी लिहीत असतात. यांचें लिखाण शाळामासिकांतून बरेंच प्रसिद्ध झालें आहे. शिवाय बालबोधमेवा मासिकांतून ते आपले लेख व गोष्टी प्रसिद्ध करीत असतात.

---

## सौ. नलिनीबाई शिंदे

प्रस्तुत कवियत्रीचा जन्म ता. १७ नोव्हेंबर १९१५ रोजीं अंकलखोप ( जि. सातारा ) येथील सूर्यवंशी पाटील घराण्यांत झाला. घरची गरिबीची स्थिति असल्यामुळें त्यांचें शिक्षण जेमतेम व्हर्नाक्युलर फायनलपर्यंतच झालें. लहानपणापासूनच त्यांना वाचनाचा अतिशय नाद असे व विशेषतः काव्य वाचण्याकडे त्यांचा फार ओढा असे. यांची ‘ सापत्नभाव ’ या नांवाची लघुकथा आमच्या ‘ प्रसाद ’ मध्यें समाविष्ट केली आहे. तसेंच माळी सेवक, पुढारी, ज्ञानमंदीर, मन्वन्तर वगैरे मासिकांतून त्यांचें लिखाण प्रसिद्ध होत असतें. लवकरच यांचा एक कवितासंग्रह प्रकाशित केला जाणार आहे.

---

## सौ. सुशिलाबाई शिरोळे

पाटें घराण्यांत रायबाग–कोल्हापूर येथें ह्यांचा जन्म झाला. शिक्षणक्रम कोल्हापूर येथील अहिल्याबाई गर्ल्स हायस्कूलमध्यें झाला. वाचण्याची आवड लहानपणापासून असल्यामुळें साहजिकच पुढें आपणही असेंच कांहींतरी दुसऱ्यांनीं वाचण्यासारखें लिहावें ही इच्छा उत्पन्न होऊन तदनंतर त्यांनीं लिखाणास सुरवात केली. संग्रहांतील यांची कविता हें त्यांचें पहिलें काव्यलिखाण. परंतु त्या एका कवितेवरूनच त्या पुढें उत्तम भावना व रसयुक्त कविता लिहूं शकतील अशी आम्हांस उमेद वाटते.

---

## सौ. सुशीलाबाई चौधरी

ह्या कराचीचे सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते श्रीयुत मोतीराम चौधरी यांच्या पत्नि असून यांचें मराठी सातवीपर्यंत शिक्षण झालें आहे. त्यांना वाचनाचा फार व्यासंग असून त्या अधूनमधून मराठी मासिकांत लेख अगर कविता लिहीत असतात. त्यांचा हिंदी आणि मराठी भाषेचा चांगला परिचय आहे.

---

## सौ. इन्दिराबाई मुळे

मे. विनायकराव कृष्णराव सप्रे, रिटायर्ड जज्ज जबलपूर, यांच्या या तृतीय कन्या असून कै० रावसाहेब गो. कृ. मुळे जहागीरदार रहेली यांच्या स्नुषा होत. सागरच्या हस्तलिखित ‘अरुण’ व ‘प्रभा’ या त्रैमासिकांतून यांच्या कांहीं कविता प्रसिद्ध झाल्या आहेत या एक उदयोन्मुख कवयित्री असून त्या लौकरच आपला कवितासंग्रह प्रकाशित करणार आहेत.

---